सुरस ग्रंथमाला पुष्प ११८

# रासबिहारी बसूंचें क्रांतिजीवन

साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास

प्रथमावृत्ति १९५२ ] [ किंमत १॥ रुपया

सुरस ग्रंथमाला - पंढरपूर.



# गृहिणी

( टॉलस्टॉयच्या ' क्रूझेर सोनाटा'चा अनुवाद )

लेखकाचा मुख्य रोख समाजांतील एका विशिष्ट सुखलोलुप वर्गाची विलासप्रियता, व्यभिचाराची प्रवृत्ति, तथाकथित सुधारणांमागील सर्वस्वी शरीरनिष्ठ बीभत्स कामुक दृष्टि, विवाहसंस्थेचा बोजवारा व या साऱ्या गोष्टीमुळें स्त्री–पुरुषाचें वाह्यत: डामडौलाचें पण वस्तुत: कवडीमोल होत असलेलें जीवन यांवरच आहे. हा सारा दिखाऊपणा बाजूला सारून साध्या, शांत, सयत व निर्मल जीवनाचा पुरस्कार या कादम्बरीत पोचडिनिचेफ यांच्या आत्मवृत्ताच्या रूपानें करण्यांत आला आहे. आधुनिक सामाजिक सुधारणावरील या कादम्बरीतील टीका विलक्षण निखट पण तेवढीच तळमळीची आहे, यात शंका नाही.

सुरस ग्रंथमाला–पंढरपूर



सुरस ग्रंथमाला पुष्प ११८

# रासबिहारी बसूंचें क्रांतिजीवन



साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास

प्रथमावृत्ति १९५२ ] [ किंमत १॥ रुपया

: प्रकाशक :
सुरसग्रंथमाला, पंढरपूर



: मालक :
राजेंद्र रावजी शहा
महाद्वार–पंढरपूर



: संचालक :
नवजीवन गौतमचंद व्होरा
केमिस्ट, सोलापूर



मुखपृष्ठावरील चित्र
केसरी संस्थेच्या सौजन्यानें



मुद्रक :
बाळकृष्ण भाऊ जोशी,
ज्ञानविलास प्रेस,
२७ बुधवार, पुणें २.

# निवेदन



माझे मित्र श्री. हिरालाल व्होरा यांनीं वारंवार आग्रह केल्यामुळें त्यांचा शब्द लेखनाच्या बाबतींत मला टाळतां येईना. म्हणून भारतीय क्रांतिकारकांचे सर्वश्रेष्ठ पुढारी व विख्यात आझाद हिंद सैन्याचे संस्थापक कै. रासविहारी बसू यांचें हें राष्ट्रभक्तीच्या भावनेनें रसरसलेलें चरित्र मी लिहून हातावेगळें करीत आहें. स्वतंत्र भारताला विधायक स्वरूपांत नवें राष्ट्रजीवन घडविण्याची प्रेरणा देण्याचें सामर्थ्य रासबिहारींच्या चरित्रांत निश्चितपणें आहे. मराठी वाचकांना त्यांच्या जीवनाची असावी तशी माहिती नाहीं. महाराष्ट्र–शारदेच्या मंगलायतनांत ही सेवा ऋजू होईल अशी आशा आहे.

दि. १ जुलै १९५२
श्री दक्षिणामूर्ति मंदिर,
स. १७ महाल, नागपूर.

**बाळशास्त्री हरदास**
साहित्याचार्य

आद्यप्रवर्तक



कै. मोतीचंद व्होरा



# रासबिहारी बसूंचें क्रांतिजीवन

# रासबिहारी बसूंचें क्रांतिजीवन

## १. प्रास्ताविक

भारतीय क्रांतिकारकांच्या इतिहासांत आझाद हिंद सेनेचे विख्यात संस्थापक ' श्री. रासबिहारी बसू ' यांचें स्थान अत्यंत श्रेष्ठ आहे. भारतीय क्रांतिकारकांचें आंदोलन हें जर एक सुवर्ण-मंदिर आहे अशी कल्पना केली तर रासबिहारी बसू हे त्याचे एक महत्त्वाचे आधारस्तंभ होत. क्रांतिकारकांच्याहि इतिहासांत रासबिहारींच्या योग्यतेचा पुरुष सहसा आढळत नाहीं. भारत-मातेचे ते एक तेजस्वी कंठमणि होते. कठोर तपश्चर्या आणि उग्र हतनिश्चय यांचें मूर्त स्वरूप म्हणजे रासबिहारी बसूंचें जीवन होय. त्यांच्या व्यवसायात्मिका बुद्धीला स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांचा अपवाद सोडून दुसरी तोड आढळावयाची नाहीं. त्यांच्या व्यक्तित्वाच्या विद्युद्गर्भ आकर्षणाला व कुशल सेनासंचालनाला तुलना नाहीं. त्यांच्या अभिजात आनंकुवादित्याला त्यांच्यावांचून दुसऱ्या कुणाचेंच नांव तुलने-साठीं म्हणून सुद्धां देतां यावयाचें नाहीं. रासबिहारी बसू हे जीवनभर संग्राम करीत व अपयशामागून अपयशाचें हलाहल पचवीत राहिले. आंदोलनाचें मेरुमांदार अनेकवार त्यांनीं उभा-रावें; व या ना त्या कारणास्तव ते भुईसपाट व्हावें; असें वारंवार घडलेलें आहे. पण जणूं कांहीं सर्व विकारांच्या वर त्यांचें व्यक्तिमत्व उभें राहिलेलें आहे. यशानें ते हुरळले नाहींत. अप-यशानें खचले नाहींत. त्यांच्या अखंड कर्मयोगांत कधीं खंड

गेले नाहींत. त्यांचें जीवन म्हणजे स्थितप्रज्ञ कर्मयोग्याचेंच जीवन होय व तेंहि जीवन असें घडलेलें आहे कीं भारताच्या स्वातंत्र्यासाठीं प्रत्यक्ष कारणीभूत असणाऱ्या या महापुरुषाच्या स्मृतिसमाधीवर कधीं फुलें उधळलीं गेलीं नाहींत कीं स्मरणाचीं निरांजनें कधीं पाजळण्यांत आलीं नाहींत. त्यांचे उत्तरायुष्यांतील सहकारी नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या प्रचंड जयघोषांत रासबिहारींचें नांवहि लोपून गेलें. अर्थातच स्वत: निर्माण केलेलें सारें साधनयंत्र सुभाषांच्या समर्थ हातीं ज्या निश्चल स्थितप्रज्ञतेनें रासबिहारींनीं सोपविलें त्याच मनोवृत्तीनें शेवटींहि सुभाषांच्या व्यक्तित्वांत विलीन होऊन जाण्यांत त्यांच्या आत्म्यानें समाधानच अनुभविलें असेल. राष्ट्राच्या बलिवेदीवर आत्मसमर्पण करावयास उद्युक्त झालेली व्यक्ति तें आत्मसमर्पण अवंचकतेनें झालें आहे कीं नाहीं यांतच खरी संतुष्ट असते. कोणी त्यांची नोंद करतो कीं नाहीं हें पाहण्याची क्षुद्रता तिच्या ठिकाणीं नसतेच. परंतु राष्ट्रीय पितरांचें स्मरण करून त्यांचें ऋण फेडणें हें प्रत्येकाचें कर्तव्य असल्यामुळें कर्तव्यपूर्तीच्या समाधानासाठीं मी त्यांचें हें चरित्र महाराष्ट्रशारदेच्या चरणीं समर्पण करतों.

## २ कौटुंबिक माहिती व पूर्वायुष्य.

रासबिहारी बसू बंगाली भद्रसमाजांतील गृहस्थ असून त्यांच्या वडिलांचें नांव विनोदबिहारी बसू असें होतें. विनोदबिहारींचा जन्म व शिक्षण बंगालमध्यें झालें असलें तरी उदरनिर्वाहाच्या व्यवसायासाठीं त्यांना बिहारप्रांतांत स्थायिक व्हावें लागलें. ते पाटण्याच्या गव्हर्नमेंट प्रेसमध्यें कारकून होते. वडिलांच्या व्यवसायामुळें जन्मानें बंगाली असलेले रासबिहारी लहानपणीं बिहारमध्येंच राहिले; व त्यांचें सारें बालपण आणि शिक्षण बिहारच्याच वाता-

वरणांत झालें. इ. स. १९०२ सालीं ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. बालपणापासूनच त्यांची प्रवृत्ति लढाऊ असल्यामुळें आर्ट्स् कोर्सचें ठरीव ठशाचें शिक्षण घेण्याऐवजीं आपण सैन्यांत भरती व्हावें असें त्यांच्या मनानें घेतलें. पण विविध प्रकारची खटपट करून देखील त्यांना ब्रिटिश सरकारकडून सैन्यांत भरती करून घेण्यांत आलें नाहीं. शेवटीं नाहीं ब्रिटिशांच्या, तर फ्रेंचांच्या तरी सैन्यांत आपण भरती व्हावें म्हणून ते पांदेचरी येथें गेले. पण तेथेंहि त्यांना नकारच मिळाला. इ. स. १८५७ नंतर ब्रिटिशांच्या लष्करी कमिशननें सैन्यभरतीच्या संबंधांत मार्शल व नॉनमार्शल रेसेस अथवा लढाऊ व बिनलढाऊ जातीचा कृत्रिम भेद उत्पन्न करून एक सूक्ष्म धोरण आखलें होतें. त्या धोरणाचें स्वरूप असें होतें कीं ज्या ज्या जमातींतून वा प्रांतांतून देशभक्तीचीं बीजें रुजण्याचा अथवा वाढीस लागण्याचा संभव असेल, त्या सर्व बिनलढाऊ जाती म्हणून सैन्यांतून सदाच्या बाजूस ठेवावयाच्या व ज्यांच्यांत हीं बीजें रुजण्याचा मुळींच संभव नाहीं त्यांना लढाऊ जमाती म्हणून सैन्यांत जागा द्यावयाची. १८५७ सालचें स्वातंत्र्ययुद्ध हें मुख्यतः भारतीय सैन्य लढलें होतें. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत ज्यांनीं ब्रिटिशांविरुद्ध आपलें खड्ग चालविलें होतें त्यांना बिनलढाऊ म्हणून ठरविण्यांत आलें व भारतमातेच्या पायांत दास्याच्या शृंखला टिकून धरण्यासाठीं या युद्धांत ज्यांनीं आपल्याच देशबांधवांचे गळे घोटले होते, त्यांना मात्र लढाऊ जमाती म्हणून ठरविण्यांत आलें. दुर्दैवानें रासबिहारी ज्या जातींत जन्म पावले होते ती या बिनलढाऊ वर्गांतील होती. इतकेंच नव्हे तर मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं १८५७ सालीं तात्या टोप्यांनीं जें संघर्षाचें सूत्र आपल्या देशबांधवांच्या हातीं

दिलें तें स्वातंत्र्य मिळेपर्यंत आपल्या हातीं राखून व खुदिरामापासून तों सुभाषचंद्र बोसापर्यंत अनेक तेजस्वी झुंजार उत्पन्न करून प्रस्थापित सत्तेशीं सतत युद्धमान राहण्याचेंच धोरण तिनें पत्करिलें होतें. ब्रिटिश सरकार व त्यांचे मित्र असलेलें फ्रेंच सरकार यांनीं रासबिहारींना सैन्यांत भरती करून न घेण्याचें खरें कारण या गोष्टींत दडलेलें आहे. असो. यानंतर निराश अंतःकरणानें रासबिहारींनीं डेहराडून येथें फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिटयूटमध्यें कारकुनीची नोकरी पत्करली व लवकरच ते तिथें हेडक्लार्क झाले. पण ब्रिटिश सरकारच्या ऑफिसांतले एक कर्तृत्वसंपन्न कारकून म्हणून लाजिरवाणा जन्म घालविण्यासाठीं रासबिहारी जन्मालाच आले नव्हते. प्रलयानलाचें उत्पत्तिस्थान असलेल्या ठिणगीवर आलेली ही एक तात्पुरत्या परिस्थितीची राख होती. कुणी तरी येऊन व फुंकून ही बाजूस सारणें अवश्य होतें. लवकरच तशी संधि आली व डेहराडूनच्या फॉरेस्ट रिसर्च इस्टिटयूटमधला हा साधासुधा दिसणारा हेडक्लार्क भारतीय क्रांतिकारकांच्या सेनापतित्वाचीं सूत्रें हलवूं लागला.

## ३ विप्लववाद्यांचा सूत्रधार

उत्तर हिंदुस्थानांत क्रांतिकारक विचारसरणीचा प्रसार व संघटना यांचा योजनाबद्ध प्रारंभ लाला हरदयाळ यांच्या १९०७ मधील पंजाब प्रांतांतल्या वास्तव्यानंतर झाला. हरदयाळ १९०८ नंतर हिंदुस्थान सोडून ज्या वेळीं इंग्लंडमध्यें गेले त्या वेळीं त्यांनीं आपल्यामागें मास्टर अमीरचंद या नांवाच्या आपल्या विश्वासू सहकाऱ्याच्या हातीं चळवळीचीं सूत्रें सोपविलीं होतीं. मास्टर अमीरचंद व त्यांचे विश्वासू सहकारी लाला हनुमंतसहाय यांनीं हरदयाळाच्या मागें या चळवळीची व्याप्ति दिल्लीपर्यंत वाढविण्याचा प्रयत्न

चालविला होता. अमीरचंद हे शिक्षकाचा व्यवसाय करीत असत. तर हनुमंतसहाय हे दिल्लीचे एक मोठे श्रीमान व्यापारी होते. हनुमंतसहाय हे मोठे समाजसुधारक म्हणून प्रसिद्ध असून दिल्लीमध्यें स्त्रियांची पडदापद्धति बंद करून त्यांनीं मोठा सामाजिक विरोध सहन केला होता. हरदयाळांच्या सहवासानें प्रभावित होऊन हनुमंतसहाय यांनीं इ. स. १९०८ सालीं आपल्या व्यापारांतून विलायती माल विकावयाचें पूर्णपणें बंद करून अतिशय तोटा सहन केला होता. इ. स. १९०९ सालीं त्यांनीं दिल्ली येथें एक राष्ट्रीय शाला काढली. मास्टर अमीरचंद प्रथम मिशन स्कूलमध्यें व नंतर एका संस्कृत महाविद्यालयांत अध्यापकाचें काम करीत असत. लवकरच ते या राष्ट्रीय शाळेला येऊन मिळाले. कांहीं दिवसानंतर त्यांनीं एक राष्ट्रीय वाचनालय काढलें. हनुमंतसहाय यांच्या राष्ट्रीय शाळेंत अवधाविहारी, गणेशलाल खिस्ती, वगैरे लोकहि अमीरचंदांच्या बरोबर शिक्षकाचें काम करीत असत. ही राष्ट्रीय शाळा वरून दिसण्यांत शाळा असली तरी क्रांतिकारकांच्या विचारप्रणालीचें शिक्षणकेंद्र व क्रांतिकारक दल संघटित करण्याचें साधन म्हणूनच तिचा मुख्यतः उपयोग करून घेण्यांत येत होता. मास्टर अमीरचंद यांनीं या आपल्या संघटनेचा बंगाली क्रांतिकारक संघटनेशीं विशेषतः अनुशीलन समितीशीं संबंध प्रस्थापित केला होता. पण अलीपूर बॉम्ब केसचें प्रकरण उद्भवून बंगाली दलाची वाताहत झाल्यानंतर बंगालचा व अमीरचंदांचा संबंध तात्पुरता तुटला. अमीरचंद २४ तास विद्यार्थ्यांना आपल्या सहवासांत ठेवीत. पुढें राष्ट्रीय शाळेंत व त्यानंतर क्रांतीच्या उठावणींत त्यांचे उजवे हात असलेले इतकेंच नव्हे तर 'राजद्वारे स्मशाने च यस्तिष्ठति स

बांधकः ' या न्यायानुरूप वधस्तंभाच्या पायऱ्याही अमीरचंदांच्या बरोबरीनेंच चढून गेलेले अवध-विहारी हे प्रथम सदैव अमीरचंदांच्या सहवासांत राहणाऱ्या विद्यार्थ्यांपैकींच एक होते. सहवासांतील विद्यार्थी तेजस्वी व कर्तृत्ववान् वाटला कीं, अमीरचंद त्याला आपल्या घरींच ठेवीत. त्याचें खाणें-पिणें ते स्वतःच करीत. अवधाविहारी प्रथमपासूनच अतिशय उत्साही व साहसी असत. कठीण परिस्थितीशीं झगडत त्यांनीं बी. ए. ची पदवी पदरांत पाडून घेतली. लाहोरच्या ट्रेनिंग कॉलेजमधून ते बी. टी. झाले. बी. टी. च्या परीक्षेमध्यें त्यांना सुवर्ण-पदक मिळालें. मास्टर अमीरचंदांच्या सहवासांत आल्यापासून देशभक्तीचे विचार त्यांच्या मनांत अंकुरले. १९०९ सालापासूनच त्यांनीं राष्ट्रीय आंदोलनांत भाग घ्यावयास प्रारंभ केला; व अलीपूर क्रांतिकट फसल्यानंतर १९११ सालीं ते अमीरचंदांच्या क्रांतिकारक चळवळींत समाविष्ट झाले. अवधविहारी हे पक्के वेदांती होते व क्रांतिकारक चळवळींत निधड्या छातीनें दिलेला भाग पार पाडीत असतां दिसून येणारी त्यांची निर्भयता त्यांच्या सहकाऱ्यांना मुग्ध करून टाकीत असे. विख्यात महात्मा हंसराज यांचा मुलगा बलराज, भाई परमानंद यांचे चुलत बंधु बालमुकुंद हेहि अमीरचंदांच्या दलांतीलच होत. रासबिहारींच्या आंदोलनांत या सर्वांचे संबंध असल्यामुळें थोडक्यांत त्यांची माहिती येथें दिली आहे. डेहराडूनच्या फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिटय़ूटमध्यें हेडक्लार्कचें काम करीत असतां रासबिहारींचा संबंध बंगालच्या मिदनापूर अनुशीलन समितीच्या सदस्यांशीं आला. लवकरच ते या संस्थेच्या महान् ध्येयाशीं एकरूप झाले व लगेच त्यांनीं

डेहराडून व कसौली येथील गुरखा सैन्यांत स्वतःचे संबंध प्रस्थापित करून तेथें ब्रिटिशांविषयीं द्रोह पसरावयास प्रारंभ केला. अनुशीलन समितीच्या सूत्रचालकांना रासबिहारींची योग्यता कळून आली व या नवीन सभासदाला कांहीं सांगण्याऐवजीं आपणासच शेवटपर्यंत मार्गदर्शन करण्याचें सामर्थ्य त्याच्याच ठिकाणीं असल्याचें आढळून येऊन त्यांनीं त्यांच्या तंत्रानें वागावयास प्रारंभ केला. रासबिहारींच्या ठिकाणीं एक अद्भुत सामर्थ होतें; तें हें कीं, ते जेथें जात तेथें त्यांच्या भोवतीं अल्पावकाशांत माणसें गोळा होत व जो प्रांत रासबिहारींच्या पदन्यासापूर्वी मृतवत् असावयाचा तो त्यांच्या आगमनानंतर थोड्याच अवकाशांत व्हेसुवियस ज्वालामुखीसारखा दाहक तप्तरसांचे लोटचे लोट वमन करूं लागत असे. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचे सेनानायक तात्या टोपे यांना ग्वाल्हेरजवळील शिवपुरी येथें फासावर चढविण्यांत आल्यानंतर जी अपूर्व आकर्षण-शक्ति त्यांच्या व्यक्तित्वाबरोबरच लुप्त झाली, ती जणूं रासबिहारींच्या आश्रयानेंच पुनश्च प्रगट झाली होती! क्रांतिकारकांच्या खासगी बैठकींतून रासबिहारीला यानंतर रासूदादा अथवा रासूदा या घरगुती नांवानें संबोधण्यांत येऊं लागलें. १९११ च्या प्रारंभीं रासबिहारींच्या नेतृत्वाखालीं डाका येथें अनुशीलन समितीची एक बैठक झाली. त्या बैठकींत अलीपूर षड्-यंत्राच्या परिस्फोटानंतर क्रांतिकारकांच्या कार्याच्या झालेल्या विचक्याची गंभीर चर्चा करण्यांत आली. यतींद्रनाथ मुखोपाध्याय अथवा प्रख्यात जतीन मुकर्जी यांच्या समर्थ नेतृत्वाखालीं सारा बंगाल संघटित होत असल्यामुळें तेथें रासबिहारींची आवश्यकता नव्हती. म्हणून या महत्वपूर्ण बैठकींत बंगालखेरीज सारा उत्तर भारत रासबिहा-

रींचें कर्तव्यक्षेत्र म्हणून ह्यांच्याकडे सोंपविण्यांत आला. ठिक-ठिकाणीं विखुरलेलीं अन् योग्य नेतृत्वाच्या व मार्गदर्शनाच्या अभावीं विस्कळित झालेलीं क्रांतिकारक दलें संघटित करण्याचें व त्या सर्वांना एकसूत्रतेंत आणण्याचें महत्वपूर्ण काम या वेळीं रासबिहारी यांनीं स्वतःच्या शिरावर घेतलें. प्रख्यात वसंत-कुमार विश्वास हे या कामांत रासबिहारींचे सहचर म्हणून राहिले. वसंत-कुमार विश्वास व शचीन्द्रनाथ संन्याल हे रासबिहारींचे डावे-उजवे हात होते. वसंत-कुमार यापुढें डहराडून येथें बाह्यतः रासबिहारींचे नोकर म्हणून ह्यांच्या घरीं राहूं लागले. या छद्मी नोकराला हरिदास या नांवानें लोक ओळखीत असत.

काम पतकरल्यानंतर अमीरचंदांच्या दलापैकीं प्रथम दीनानाथ व चतर्जी या दोघांशीं रासबिहारींनीं परिचय करून घेतला, व त्यानंतर बालमुकुंद, अवधविहारी व मास्टर अमीरचंद यांच्याशीं ओळख करून घेऊन आपल्या व्यक्तित्वाचा दिल्लीच्या क्रांतिकारक दलावर त्यांनीं पूर्णपणें प्रभाव बसाविला. रासबिहारींनीं आपला नोकर हरिदास अथवा खरें म्हणजे सहकारी वसंतकुमार विश्वास यांच्या साहाय्यानें मास्टर अमीरचंद, अवध बिहारी, भाई बालमुकुंद व दीनानाथ यांना बाँबचें शिक्षण दिलें व Liberty नांवाच्या राजद्रोह पसरविणाऱ्या पत्रकांचा त्याच्या द्वारें खूप प्रचार कराविला. या पत्रकांतून ब्रिटिशांची जशी नालस्ती केली जाई, तसेंच आपल्या देशबांधवांना भरपूर उत्तेजित करण्यांत येत असे. एकदां त्या पत्रकांत असें प्रतिपादन करण्यांत आलें होतें कीं, " देशाचे शत्रु मग—ते कोणत्याही पंथाचे, वर्णाचे वा जातीचे असोत—त्यांचा नाश केलाच पाहिजे अशी गीता, वेद व कुराण यांची शिकवण आहे. इंग्रजांच्या यंत्रासिद्ध शस्त्रसंभाराना भिण्याचें

आपणांस कांहीं कारण नाहीं. कारण आपण संख्येनें त्यांच्यापेक्षां इतके बलिष्ठ आहोंत कीं, त्यांच्याजवळून त्यांच्या तोफा व इतर शस्त्रास्त्रें आपण हिसकावून घेऊं शकतों. ”

## ४ पंजाबमध्यें रासबिहारी

यानंतर रासबिहारी मास्टर अमीरचंदांशीं पुढच्या कार्यासंबंधीं बोलून स्वत: पंजाबमध्यें गेले. तेथील कार्यकर्त्यांच्यामध्यें नवचैतन्य निर्माण करून त्यांनीं गुप्त संस्थांची स्थापना केली व भाई बालमुकुंद यांच्या हातीं तेथील कार्याचीं सूत्र सोपविलीं. रासबिहारीच्या या आगमनाचा पंजाब प्रांतावर झालेला परिणाम इतका विलक्षण होता कीं, १९१२ सालीं सर मायकेल ओडवायर यांची पंजाबचे गव्हर्नर म्हणून नेमणूक करीत असतांना त्यांना सरकारतर्फे असें स्पष्ट शब्दांत सांगण्यात आलें होतें कीं, “ पंजाबमध्यें ज्वालामुखी स्फोट होण्याच्या बेतांत आला असून त्याचा स्फोट केव्हां होईल याचा कांहीं एक नियम नाहीं. तरी तो स्फोट सहन करण्याची पूर्ण तयारी ठेवूनच पंजाबचा कारभार हातीं घ्यावा. ” बॉंब व पिस्तुलांचा उपयोग करून घेऊन इंग्रजी रक्तानें भारताची भूमि ओली चिंब करणें व पवित्र सप्तनद्यांचें पाणी लालभडक करणें हाच खरा युगधर्म आहे असें मानणारी एक चमत्कारिक मनोवृत्तीची युवक-सृष्टि नव्या जोमानें उत्पन्न होऊं लागली असून इंग्रजी सत्तेनें केलेलें हिंदुस्थानचें शांततापूर्ण नंदनवन जाळून पोळून बेचिराख करण्याचा व रुद्राच्या प्रलयकर तांडवाचें नृत्यपीठ ठरणारें तें भयानक स्मशान बनविण्याचा त्यांनीं निर्धार केलेला आहे, ही गोष्ट भारत सरकारला केव्हांच कळली होती. त्यांना कळलें नव्हतें तें हें कीं, या अभिनव युवक सृष्टीचा खरा सूत्रधार

कोण आहे? म्हणून सरकार खरें बेचैन होतें. सरकारनें सर मायकेल ओडवायर यांना पंजाबच्या परिस्थितीची नीट कल्पना आणून दिल्यानंतर मायकेल हे पंजाबकडे अतिशय सावधगिरीनें लक्ष पुरवीत होते. पण रासबिहारी कांहीं कच्च्या गुरूचे चेले नव्हते. क्रांतिशास्त्रांतला नेहमींचाच नियम प्रस्थापित सत्तेचा अपेक्षाभंग हा आहे. गनिमी काव्याच्या पद्धतींत या नियमाला अतिशय मानाचें अन् महत्वाचें स्थान आहे. रासबिहारींनीं हें ओळखलें कीं पंजाबवर सरकारचें अधिक लक्ष आहे. म्हणून त्यांनीं दिल्ली हें आपल्या अंगीकृत कार्याच्या पहिल्या धडाकेबाज सलामीचें क्षेत्र निवडलें आणि त्या दृष्टीनें त्यांच्या हालचाली निर्वेधपणें सुरू झाल्या.

सरकार या सुमाराला अशी संधी पहात होतें कीं, जिच्यामुळें हिंदुस्थानांतील प्रक्षोभक असंतोषाचें जें मूळ ‘ बंगालची फाळणी ’ तेंच नष्ट करून टाकून हा असंतोष कायमचा गाडून टाकतां येईल. अर्थातच बंगालची फाळणी रद्द करतां आली तरी तिच्यामुळें क्रांतिकारक चळवळ नष्ट करतां येईल ही सरकारची अपेक्षा मात्र फोल ठरली. सन १९१० सालीं इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा सप्तम एडवर्ड हे ख्रिस्तवासी होऊन त्यांच्या जागीं त्यांचे चिरंजीव राजे पंचम जॉर्ज हे गादीवर बसले. पूर्व योजनेनुसार नूतन बादशहा पंचम जॉर्ज हे हिंदुस्थानांत आपली पवित्र, वैभवशाली व भाग्यशाली पायधूळ झाडावयास निघाले ! दिल्ली येथें १२ डिसेंबर १९११ रोजीं सम्राट पंचम जॉर्जच्या उपस्थितींत इतका सुभव्य दरबार करण्यांत आला कीं, त्याच्या गाजावाजानें नुसत्या हिंदुस्थान देशांतलेच नव्हे तर द्वीपद्वीपांतरांतले देखील दिक्कोन दमदमन उठले ! बादशहांनीं आपल्या प्रजेवर स्वतःच्या

औदार्याची, श्रेष्ठतेची व अभिजात भूपतित्वाची छाप पाडीत अशी घोषणा केली कीं, बंगाली प्रजेच्या आंतरिक असंतोषाकडे व दुःखाकडे लक्ष पुरवून, लॉर्ड कर्झन यांच्या अमदानींत झालेली फाळणी खास बादशाही आज्ञेनुसार रद्द करण्यांत येत आहे. पूर्व व पश्चिम बंगाल पुनश्च एकत्र जोडण्यांत येत असून एकसंधी बंगालचें आधिपत्य यापुढें एकाच लेफ्टनंट गव्हर्नरच्या हातांत राहील. याप्रमाणें बादशहांची घोषणा होऊन हिंदी प्रजेनें केलेल्या स्वागताचा आणि अभिवादनाचा स्वीकार करीत बादशहा निघून गेले. पण हा प्रसंग झाला तरी त्याचें कवित्व शिल्लक राहिलें होतें. नूतन बादशहांचे नूतन व्हाइसरॉय लॉर्ड हॉर्डिंज यांची या कवित्वाच्या समारोहांत राजप्रतिनिधि म्हणून नियुक्ति झाली होती. नव्या राजवटीची नवी राजधानी म्हणून जुन्या मोंगली राजवटींतील दिल्लीच्या बाहेर नवी दिल्ली या नांवाचे एक उपनगर बसवावयाचें ठरविण्यांत आलें. तदनुसार या नव्या वैभवशाली उपनगराचा कोनशिला-समारंभही मोठ्या उत्साहानें व वैभवानें उरकण्यांत आला. व्हाइसरॉय व भारत सरकार यांच्यासाठीं म्हणून या उपनगरांत स्वतंत्र गगनचुंबी इमारतींची योजना झाली. संस्थानिकांचे वैभवशाली व मांडलिकत्वाचे निदर्शक असणारे वाडे राजप्रतिनिधीच्या प्रासादाभोंवतालीं बांधण्याच्या योजना झाल्या व बादशहांच्या दिल्ली दरबारानंतर बरोबर एक वर्षानें दि. २३ डिसेंबर १९१२ रोजीं व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांचा थाटाचा नगरप्रवेशसमारंभ ठरला. राजसत्तेच्या वैभवाचें, दराऱ्याचें व थाटाचें या समारंभांत अपूर्व प्रदर्शन करण्याच्या योजना आंखण्यांत आल्या होत्या.

पण सरकारची कल्पना, भारतीय विप्लववाद व बंगालची फाळणी या दोन गोष्टींत जन्यजनक भाव ठरवितांना चुकली होती.

बंगालच्या फाळणीनें विप्लववाद उत्पन्न झाला नाहीं, तर त्याला जनतेंत पसरायला एक संधि लाभली इतकेंच काय तें. बंगालची फाळणी होणें अगर झालेली फाळणी रद्द होणें या दोनहि गोष्टी क्रांतिकारकांच्या दृष्टीनें इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत कायम राहणार आहे या वस्तुस्थितीच्या जाणिवेमुळें फारशा किंमतीच्या नव्हत्या. क्रांतिकारकांना या देशांतलें इंग्रजी राज्यतंत्र उलथून पाडावयाचें होतें. चाळीस कोटी लोकसंख्येचा व जीवनाच्या तत्वज्ञानाच्या दृष्टीनें सर्व जगताचें गुरुपीठ म्हणून गाजलेला हा देश मूठभर लोकसंख्येच्या इंग्लिशांच्या ताब्यांत राहून कुत्र्याहूनहि लाजिरवाणें जीवन जगत आहे, या गोष्टीची क्रांतिकारकांना मनापासून चीड आली होती. ब्रिटिश सरकारला त्यांना या गोष्टीची जाणीव करून द्यावयाची होती कीं, १८५७ सालीं सेनापति तात्या टोपे यांनीं या देशांत प्रस्थापित होत असलेलें परकीय राज्यतंत्र उलथून पाडण्यासाठीं समशेर जी निष्कोषित केली, ती अनेक हात बदलत गेले व जातील तरी, इंग्रजी राज्य जोंपर्यंत या देशांत टिकून होतें तोंवर म्यानांत जाणें केवळ अशक्य होतें. बंगालची फाळणी रद्द झाल्यानें त्या प्रांताचा सांस्कृतिक एकसंधीपणा राखला गेला हें खरें आहे; पण बंगाल हा परक्या राज्यसत्तेनें नेमलेल्या एका लेफ्टनंट गव्हर्नराच्या हाताखालीं नांदणार आहे, ही जाणीव कांहीं फाळणीच्या जाणिवेपेक्षां कमी दुःखप्रद नाहीं. हिंदुस्थानांत या व अशा अनेक विषबीजांवर तात्पुरते उपचार करून भागणारें नसून हीं सारीं विषबीजें पेरून स्वतःच्या स्वार्थासाठीं चाळीस कोटी भारतीय प्रजेचें रूपांतर श्वासोच्छ्वास करणाऱ्या प्रेतसंभारांत करावयाचें ज्या सत्तेनें ठरविलें आहे, ती इंग्रजी राज्यसत्ता आम्हांला या देशांत नको असून ती उखडून टाकण्यासाठींच मुख्यतः

आम्हीं शस्त्र उपसलें आहे, हें क्रांतिकारकांना नुसत्या सरकारच्याच नव्हे तर जगाच्या अन् जगत्सूत्रचालकाच्याहि नजरेस आणून घायचें होतें. हें व्याख्यानांनीं साधणारें नव्हतें, व वर्तमान-पत्रांतील लेखांनीं भागणारें नव्हतें. प्रत्यक्ष रणात्मक कृतीची या गोष्टीसाठीं अतिशय आवश्यकता होती. शांततेनें दिल्ली दरबार हिंदुस्थानांत पार पडूं शकला याचा अर्थ, हिंदुस्थानांतील लोक गुलाम व्हावयासाठींच जन्माला आले आहेत, असा जगांतील स्वातंत्र्यवाद्यांनीं केला असणें अत्यंत स्वाभाविक होतें आणि तसा अर्थ होऊं देणें यांत भारताच्या यशोगौरवाचाच नुसता नव्हे, तर साऱ्या विशाल मानवतेचाहि अत्यंत अपमान होता. क्रांतिकारकांचे सेनापति रासबिहारी बसू यांनीं ही परिस्थिति नीटपणानें ओळखली व भारताच्या यशोगौरवाला लागलेलें हें लांछन धुवून काढण्याचा त्यांनीं दृढनिश्चय केला. त्यांना साऱ्या जगताच्या कानाचे पडदे फाडून स्वातंत्र्यवाद्यांच्या हृदयाला जाणीव होईल इतक्या जोरानें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकांक्षेची उच्च घोषणा उच्चारावयाची होती. ज्यांनीं दशदिशांचे दिक्कोन दणाणून उठतील, दिग्गजांचीं मस्तकें भणाणून जातील, ब्रह्मदेवाचें कडासन तडकून जाईल अन् आदिनारायणाची अखंड समाधि भंग पावेल, इतकी गोठी गर्जना रासबिहारींना करावयाची होती. भारताच्या यशोगौरवाला लागलेलें कृष्ण लांछन धुवून काढण्यासाठीं ब्रिटिश राज्यसत्तेलाच रक्तलांछन लावावयाचें रासबिहारींनीं ठरविलें व त्या दृष्टीनें राजप्रातिनिधि लॉर्ड हार्डिंज यांचा हा नगरप्रवेशसमारंभ म्हणजे एक पर्वणीच आहे असें ते समजले.

### ५ स्फोट, सहकाऱ्यांना फाशीं, काळें पाणी

ठरल्याप्रमाणें दि. २३ डिसेंबर १९१२ रोजीं लॉर्ड हॉर्डिंज

यांचा नगरप्रवेशसमारंभ मोठ्या दर्पानें अन् दिमाखानें सुरू झाला. छिन्नमुंडा चंडिकेच्या काल्पनिक रुधिरप्रियतेला वास्तवतंत लाजविणाऱ्या त्या रुधिरप्रिया दिल्लीच्या सुभव्य राजरस्त्यावरून तोऱ्यानें मिरवीत लॉर्ड हॉर्डिंज यांची स्वारी दिल्लीच्या चांदणी-चौकांत आली मात्र, तोंच धाड्दिशीं बॉंबचा भयानक स्फोट होऊन सारें अंतराळ धुरानें अन् वायुमंडळ त्या स्फोटाच्या दणक्यानें भरून गेलें. गुरु तेगबहादूर अन् भाई मातिदास यांच्या पवित्र रक्तानें अवघ्या दीड-दोन शतकांपूर्वीं माखून निघालेल्या त्या चांदणी चौकाची चिडलेली वास्तुदेवताच जणूं या स्फोटाच्या रूपानें मिरवीत येणाऱ्या ब्रिटिश राजसत्तेच्या त्या प्रतिनिधीकडे पाहून विकट अट्टहास्य करीत होती. पण ज्या अज्ञात शक्तीनें तो भयानक बॉंब व्हाइसरॉयच्या रोखानें फेकला होता, तिच्या दुर्दैवानें अन् हॉर्डिंज यांच्या आयुष्याचें सूत्र बळकट असल्यामुळें बॉंब त्यांना न लागतां तो हत्तीवर मागें बसलेल्या त्यांच्या अंग-रक्षकाला लागला. अंगरक्षक तर जागच्या जागींच ठार झाला; व व्हॉइसरॉयांच्या मानेजवळ थोडीशी जखम झाली. पण झालेला प्रकार इतका अनपेक्षित व धक्का देणारा होता कीं, व्हाइसरॉय-साहेब जागच्या जागीं मूर्छित पडले, जनता सैरावैरा धावूं लागली, तमासगीर पळूं लागले व लष्कर आणि त्यावरील अधिकारी स्तिमित होऊन गेले. कांहीं वेळ गेल्यानंतर पोलिसांनीं व लष्क-रानें साऱ्या चांदणी चौकाला वेढा दिला. आसमंतांतली प्रत्येक वस्तु अन् व्यक्ति यांची कसोशीनें तपासणी झाली. पण व्यर्थ ! त्या दिवशींच काय पण कित्येक महिने गेले तरी बॉंब फेक-णाऱ्यांचा मागमूस देखील लागेना !

त्यानंतर बरोबर पांच महिन्यांनीं मे १९१३ मध्यें लाहोरच्या

लॅारेन्स गॅार्डनमध्यें सिव्हिलियन पदाधिकारी पार्टीच्या निमित्तानें एकत्र जमले असतां तेथें एक बॅाँबचा स्फोट झाला. आणखीही कित्येक ठिकाणीं या घटनांची पुनरावृत्ति झाली. पण सरकारनें पुष्कळ डोकें आपटलें तरी ह्या घटनेचा सूत्रधार तर दूरच राहिला, पण लहान-सहान गोष्टीचाही मागमूस लागू शकला नाहीं आणि पत्ता तरी कसा लागणार ? कारण या घटनेचें रुद्रकाव्य ज्यांच्या प्रतिभेंतून जन्म पावलें होतें व ज्यांच्या क्रियाशक्तीनें तें पूर्ण केलें होतें ते रासबिहारीच या वेळीं सरकारच्या गुप्तचर खात्याचे जबाबदार अधिकारी म्हणून काम करीत होते. वरून दिसायला ते डेहराडूनच्या फॅारेस्ट रिसर्च इन्स्टिटयूटमध्यें हेडक्लार्क होते. सरकारच्या मतें ते त्यांच्या गुप्तचर खात्यांतील महत्वाचे अधिकारी होते, व खरें म्हणजे या देशांतील ब्रिटिश राज्यतंत्र मुळापासून उखडून फेकून द्यावयाच्या प्रतिज्ञेनें हिंदुस्थानांतली स्मशानशांतता जाळून टाकावयास हातांत पेटती मशाल घेऊन संबद्ध झालेले ते महान क्रांतिकारक होते ! कित्येक दिवस याप्रमाणें शोधांत गेल्यानंतर एके दिवशीं कलकत्ता येथें राजा बझारस्ट्रीटवरील एका घराची झडती घेत असतांना प्रथम अवधबिहारींच्या नांवाचा व त्यानंतर मास्टर अमीरचंदांच्या नांवाचा पत्ता लागला. दिल्ली येथें अवधबिहारी, मास्टर अमीरचंद यांच्या घरच्या झडत्या घेण्यांत आल्या. त्या वेळीं तेथें सिमल्याहून आलेलें एक एम.एस. अशी सही असलेलें पत्र मिळालें. लगेच मास्टर अमीरचंद, अवधबिहारी व अमीरचंदांचा मुलगा सुलतानचंद यांना अटक करण्यांत आली. या एम. एस. ची चौकशी केल्यानंतर त्यांचें खरें नांव दीनानाथ असल्याचें आढळून आलें. तात्काळ लाहोर शहरांतल्या साऱ्या दीनानाथांच्या घराला कलपें ठोकण्यांत येऊन

त्यांना तुरुंगांत बंद करण्यांत आलें. त्यांतला एक दीनानाथ तोंडानें राजकीय स्वरूपाची फार बडबड करीत असून रिकाम-टेकडा असे. त्याला पोलीस कस्टडींत आणतांच त्यानें मोठ-मोठ्यानें रडावयास व ओरडावयास प्रारंभ केला. असें सांगतात कीं, डेप्युटी सुपरिटेंडेंट सरदार सुक्खासिंह यांचे तापलेल्या निखाऱ्यासारखे लाल व वटारलेले डोळे पहातांच घाबरून जाऊन थरथर कापत तो म्हणूं लागला कीं, ' मी हवें तर सगळें कार-स्थान सांगतों; परंतु कृपापूर्वक हे भयंकर डोळे मला दाखवूं नका. ' दीनानाथ माफीचा साक्षीदार बनला. त्यानें सांगितलें कीं, १९०८ सालीं हरदयाळ हिंदुस्थानांत आले असतां त्यांनीं राजकीय शिक्षणाचे वर्ग सुरू केले होते. त्या वेळीं त्यांच्या शिष्य-वर्गांत मि. जे. एन. चॅटर्जी व दीनानाथ होते. हरदयाळ हिंदुस्थान सोडून जात असतां त्यांनीं आपल्या जागीं मास्टर अमीरचंद यांची योजना केल्यामुळें दीनानाथही यानंतर दिल्ली येथें येऊन अमीरचंदांच्या जवळ राहूं लागला. १९११ च्या सुमारास दीना-नाथाचा परिचय रासबिहारी बसू यांच्याशीं झाला. रासबिहारींनीं दीनानाथ, अवधबिहारी, अमीरचंद इत्यादि मंडळींचा परिचय वसंत-कुमार विश्वास, जे रासबिहारींच्या जवळ हरिदास या छद्मी नांवानें नोकर म्हणून होते, त्यांच्याशीं करून दिला. रासबिहारींनींच या सगळ्या मंडळींना हाताशीं धरून क्रांतिकारक संघटना तयार केली. दीनानाथनें या नांवाव्यतिरिक्त लाला हंसराज यांचे चिरंजीव बलराज, भाई परमानंदांचे चुलतबंधू व जोधपूरच्या राजकुमारांचे शिक्षक भाई बालमुकुंद, चरनदास इत्यादि लोकांचींही नांवें सांगितलीं. दीनानाथनें लाहोर, दिल्ली, येथील साऱ्या क्रांतिकारक घटना या रासबिहारींच्याच मेंदूतून तयार

झाल्या असून उपयुक्त गुप्तदलानेंच त्या पार पाडल्या असल्याचें सांगितलें. दीनानाथानें लॉरेन्स बागेमधील घटनेचें जरी व्यवस्थित वर्णन केलें तरी त्याला दिल्लीच्या घटनेचें कांहीं नीट वर्णन करतां आलें नाहीं. पण दीनानाथानें आपल्या साक्षींत रासबिहारींचें क्रांतिकार्यातलें महत्व व त्यांचें राहण्याचें ठिकाण यांचा परिस्फोट केल्यामुळें यापुढें रासबिहारींना आपला आयुष्यक्रम बदलणें प्राप्त झालें. कारण सरकारनें त्यांच्यावर वॉरंट काढलें. या वेळीं दिल्लीला जखमी झालेले व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज हे डेहराडून येथें आले असतां रासबिहारी हे गुप्तचर विभागातर्फे त्यांच्या स्वागताच्या योजनेंत काम करीत होते. पण ही कुणकुण कळतांच ते एकदम गुप्त झाले.

रासबिहारींना पकडण्याचा सरकारनें पुष्कळ प्रयत्न केला; पण अखेरीस ते सांपडत नाहींत असें पाहून १९१४ सालच्या मार्च महिन्यांत तेरा अभियुक्तांवर खटला भरण्यांत आला. ते अभियुक्त हे होते—दीनानाथ, सुलतानचंद, मास्टर अमीरचंद, अवधबिहारी, भाई बालमुकुंद, वसंत कुमार, विश्वास ऊर्फ हरिदास, बलराज, लाला हनुमंतसहाय, चरनदास, मन्नूलाल, रघूवर शर्मा, रामलाल व खुशीराम. यांपैकीं दीनानाथ हा एका पोलिस अधिकाऱ्याचे डोळे पाहून घाबरून माफीचा साक्षीदार बनलाच होता. मास्टर अमीरचंदाचा मानीव मुलगा कुलकलंक सुलतानचंद हा दंडाबेडीच्या तडाख्यानें माफीचा साक्षीदार बनला. सुलतानचंदाच्या या खाल्ल्या घरचे वासे मोजण्याचे कृत्यानें धैर्यमेरू मास्टर अमीरचंद यांना इतकें परमावधीचें दु:ख झालें कीं, तो साक्ष द्यावयास उभा राहिला त्या वेळीं मास्टरजी भर कोर्टांत अश्रुपात करूं लागले. ५ ऑक्टोबर १९१४ रोजीं सेशन्स जज्जानें निकाल देतांना अवधबिहारी,

मास्टर अमीरचंद व भाई बालमुकुंद यांना फांशी; बलराज, लाला हनुमंतसहाय व वसंतकुमार विश्वास यांना आजन्म काळें पाणी, अशा शिक्षा ठोठावून बाकीच्या आरोपितांना सोडून दिलें. नंतर सरकारतर्फे खटला हायकोर्टामध्यें नेण्यांत आला. हायकोर्टानें आपल्या निर्णयांत मास्टर अमीरचंद, अवधबिहारी, भाई बालमुकुंद व वसंत कुमार विश्वास यांना फांशीं, चरणदासाला आजन्म काळें पाणी, व बलराज आणि लाला हनुमंतसहाय यांना सात वर्षें सक्त मजुरी अशा शिक्षा ठोठावल्या. वास्तविक पहातां या खटल्यांतील एकाहि साक्षीदारानें लॉर्ड हॉर्डिंजवर दिल्ली येथें फेकण्यांत आलेल्या बाँबच्या खटल्यांत गोवण्यांत आलेल्या व्यक्तींशीं संबंध असल्याचें सिद्ध केलें नाहीं. पण कायद्याच्या दृष्टीनें त्यांच्यावरील आरोप सबळ पुराव्यानिशीं सिद्ध व्हावयास हवा. असा सिद्ध होत नसतांना देखील आकसानें सरकारनें या चार लोकांना फांशीं दिलें व प्रीव्ही कौन्सिलनें त्यांचें अपील ठोकरून देऊन कायद्याच्या जगांत स्वत:वर असलेल्या जबाबदारीची ही बजावणी केली ! याचें नांव इंग्रजी न्याय ! या आरोपितांपैकीं, **वसंतकुमार विश्वास** हे हरिदास या नांवानें रासबिहारीच्या जवळ नोकर म्हणून राहात होते हें मागें सांगितलेंच आहे. वसंत कुमार हे बंगालमधील नादिया जिल्ह्याचे राहिवासी होते. कांहीं दिवस आपल्या लाडक्या रासूदाजवळ डेहराडून येथें वास करून नंतर १९१२मध्यें ते लाहोर येथें एका दवाखान्यामध्यें कंपाउंडरची नोकरी पतकरून राहूं लागले. दिल्लीच्या बाँबची अद्भुत घटना ज्या वेळीं घडून आली त्या वेळीं वसंत कुमार हे लाहोरमधून एकाएकीं गुप्त झाले होते असें सांगतात. १९१३ सालच्या डिसेंबर महिन्यांत ते बंगालमध्यें गेले व १९१४ सालीं तेथेंच अटक करून त्यांना लाहोर येथें

आणण्यांत आलें. प्रथम वास्तविक त्यांना काळया पाण्याची शिक्षा झाली होती. पण लॉर्ड हार्डिंजवर बाँब फेकण्याचें साहस करणाऱ्या व्यक्तींचा कांहीं एक पत्ता न लागूं शकल्यामुळें पंजाब प्रांताचे प्रख्यात रक्तपिपासू गव्हर्नर सर मायकेल् ओड्वायर यांचा क्रोधवन्हि इतका भडकला होता कीं, त्यांनीं बुद्धया अपील करून रासबिहारींच्या या निष्ठावंत अनुचराला वधस्तंभावर लटकविलें. फाशीच्या वेळीं वसंत कुमारांचें वय केवळ २१ वर्षांचें होतें!

## ६ अद्भुत साहस आणि अपूर्व ध्येयवाद

हायकोर्टाच्या न्यायमूर्तींनीं 'फांशीची शिक्षा' हीं अक्षरें उच्चारतांच हे चारहि वीरश्रेष्ठ अतिशय प्रमुदित झाले. शांतपणें निद्रादेवीच्या निर्भर आलिंगनांत मग्न झालेल्या अवध बिहारींना वधस्तंभाकडे नेण्यास्तव म्हणून जेव्हां उठविण्यांत आलें त्या वेळीं त्यांचा इंग्रज पर्यवेक्षक त्यांना म्हणाला कीं, "आपली अंतिम इच्छा काय आहे?" त्यावर अवध बिहारी आपली तेजस्वी नि नि तीक्ष्ण दृष्टि त्यांच्यावर रोखीत किंचित् स्मितपूर्वक म्हणाले, "अंतिम इच्छा? अरे, जी इच्छा जन्मभर हृदयाशीं बाळगली ती या अंतिम वेळीं सोडून देण्यासाठीं का आम्हीं बाळगली? जी इच्छा आरंभीं तीच अंतींही तशीच कायम आहे. तुला ती ऐकावयाची आहे काय? ऐक तर माझी अंतिम इच्छा, नीट कान देऊन ऐक. इंग्रजी साम्राज्य नष्ट व्हावें, ही माझी अंतिम इच्छा आहे!" तो पर्यवेक्षक त्यावर त्यांना म्हणाला, "शांत व्हा, शांत व्हा. आज आतां प्राण देतांना तरी शांतपणानें तो द्यायला काय हरकत आहे? आतां या असल्या गोष्टींपासून काय बरें लाभ आहे?" अवधबिहारी यावर म्हणाले, "आज अन् शांति? आज कसली शांति आली आहे? माझी तर अशी उत्कट इच्छा आहे

कीं, आजपासून आग भडकावी. भयंकर आग! अगदीं चारी बाजूंनीं पेट घेऊन साऱ्या विश्वाला भाजून काढणारी महाभयंकर आग! अशी आग भडकावी कीं जिच्या धडाडून उफाळणाऱ्या ज्वालांमध्यें तुम्ही, आम्ही, तुमचें सारें साम्राज्य आणि आमची लाजिरवाणी दासता या साऱ्यांचें भस्म होऊन भारतवर्षाचें कांहीं काळ पेटतें अरण्य होऊन जाईल. कारण या महान् यज्ञांतूनच भारताचें वैभवशाली अन् दीप्तिमान स्वरूप उदयाला यायचें आहे!" फाशीं जातांना या साऱ्या वीरांनीं वधस्तंभावर आनंदानें उड्या घेतल्या, फासाची तात स्वतःच्या हातांनीं ओढून आपल्या गळ्याभोवतीं आवळून घेतली अन् एकवार वंदे मातरम्‌च्या जय-निनादांनीं आसमंतांतील वातावरण मुखरित करून आपली सेवा निवेदन करण्यासाठीं ते अशाश्वत जगाचा शेवटचा निरोप घेऊन देवलोकीं निघून गेले.

## ७ धैर्याच्या महामेरूला करुणेचा पाझर

हसतखेळत वधस्तंभावर लटकलेल्या या महाभागांच्या मध्यें वसंतकुमार विश्वास व भाई बालमुकुंद हे तारुण्याच्या दारवंठ्यावर नुकतेच प्रवेश केलेले होते. भाई बालमुकुंद हे वधस्तंभावर लटकल्या-नंतर त्यांची पत्नी रामरक्षिता ही सती गेली. बालमुकुंद हे पंजाबकेसरी लाला लजपतराय यांचे निष्ठावंत व प्रमुख विश्वस्त होते. इ. स. १९११ च्या सुमारास रामरख्खी नांवाच्या सुंदर व सद्गुणी मुलीशीं त्यांनीं प्रेमविवाह केला होता. पण अल्पवयांतच त्यांच्या सोन्याच्या संसारांतील स्वर्गीय आंनदाच्या उन्मेषावर हा कुठाराघात झाला. सरोवराच्या कांठीं प्रफुल्ल कमलिनी वायूच्या मंद झुळकीबरोबर डुलत असतात. भ्रमराच्या खुळ्या मनाला असें वाटतें कीं, त्यांचा हा विभ्रम नेहमीं असाच रहावा. पण त्या कमलिनींना

गजेंद्राच्या विकराल शुंडादंडाचा विळखा पडून त्या मुळासकट उपटून फेंकल्या जातात. पुष्पें हीं खुडलीं जायचींच. तीं देवाच्या चरणीं पडलीं तर जीवनाची इतिकर्तव्यता त्यांनीं मिळविली.

*' परी जे गजेंद्रशुंडेनें उपाटिलें । श्रीरामचरणीं समर्पियलें ।*
*कमलफूल तें अमर ठरलें । मोक्षदायी पावन ।*
*अनेक फुलें फुलती । फुलोनिया सुकोनि जाती ।*
*कोणी तयांची महती गणती । ठेविली असे । '*

बालमुकुंदांचा सोन्याचा संसार उधळला. पण त्यांचें जविन-पुष्प मात्र श्रीहरीच्या चरणीं समर्पण झालें. फांशीची शिक्षा झाल्यावर ते उद्गारले, " ज्या लाहोरांत माझे पूज्य पूर्वज भाई मतिदास ह्यांनीं स्वधर्म व स्वातंत्र्य याकरितां बलिदान केलें तेथेंच मीहि मातृभूच्या चरणीं आत्मसमर्पण करीत आहें. यांत 'मला समाधान आहे. " फाशीचा दिवस निश्चित झाल्यावर बालमुकुंदांची पत्नी मधूनमधून त्यांना भेटावयास जात असे. फांशीच्या शिक्षेची वार्ता ऐकतांच ती दुःखानें वेडी झाली! कदलीच्या कोमल गाभ्या-वर झालेला हा एक दारुण कुठाराघातच होता आणि तोहि किती अवचितपणें ! किती अवेळीं ! ज्या दिवशीं बालमुकुंद धीरोदात्ततेनें वधस्तंभावर चढून गेले त्या दिवसापासून तिनें अन्न-पाणी वर्ज्य केलें व शेवटीं तिनेंहि पतीला भेटण्यासाठीं स्वर्गाला प्रयाण करून वधस्तंभावर प्रणयसंगीताचे अमरनाद उमटविले. भारतीय सतींच्या मालिकेंत ती मेरूमण्याच्या जागीं विराजमान झाली. पतीनंतर ती सती तीन आठवडेसुद्धां मृत्युलोकांत राहूं शकली नाहीं. पाण्यावांचून नदी व प्राणावांचून काया कशी राहूं शकेल ? बालमुकुंद म्हणजे त्या सतीचें काय नव्हतें ? तिचें वृत्त तिच्याच तोंडून वदवून तिचे वडील दीर व भारताचे महान नेते

कै. श्री. भाई परमानंद यांनीं आपल्या आत्मचरित्रांत हृदयस्पर्शी रीतीनें चित्रित केलें आहे. त्यांत कारुण्य इतकें साठलें आहे कीं, तें वाचून हृदय असलेल्या प्रत्येकाच्या डोळ्यांतून अश्रूसरी ओघळतील. भाईजी लिहितात—

( १ ) "फूल उमललें होतें. फुलाच्या पाकळ्यांची मृदुता आणि त्याचें सौन्दर्य यावर मोहित होऊन कोकिला कूजन करीत होती. इतक्यांत माळी आला व फुलाभोंवतीं पिंगा घालणारी कोकिला भीतीनें उडून पळून गेली. परंतु माळ्यानें निर्दयतेनें फूल खुडून त्याच्या पाकळ्या पाकळ्या तोडून आपल्या टोपलींत भिरकावून दिल्या. कोकिला! तिनें किंचाळून आक्रंदन केलें; पण सारें व्यर्थ! ती देखील खालीं चक्कर येऊन पडली व आपल्या आवडत्या फुलाबरोबर परलोकीं चालती झाली."

( २ ) "तो वसंत ऋतु होता. बालमुकुंद तुरुंगांत आणि मी घरीं होतें. सहा महिनेपर्यंत मी त्यांची वाट पहात होतें. सारे लोक म्हणत, 'असं वेड्यासारखं करूं नकोस. ते लवकरच सुटून परत येतील.' यावर मी म्हणे, 'तो दिवस केव्हां उगवणार? ही दुःखाची काळी कभिन्न रात्र केव्हां संपणार? येईल का तो सुखाचा क्षण?' मला दिल्लीला जाण्याचा केव्हां योग आला असता? पण त्यांना दिल्लीला ठेवलें होतें. खटल्याची चौकशी देखील तेथेंच चालू होती. म्हणूनच मी दिल्लीला गेलें. त्या तुरुंगांतील बराकी फार भयंकर होत्या व येवढ्या कडक उन्हाळ्याच्या दिवसांत देखील त्यांना रात्रंदिवस त्या चिंचोळ्या बराकींतूनच ठेवण्यांत येत होतें. मीं त्यांना विचारलें, 'तुम्हांला झोपायला इथें खाट मिळते का?' त्यावर ते म्हणाले, 'तूं किती भोळी आहेस? इथें खाट, कशी

मिळणार ? ' मीं विचारलें, ' मग आपण कशावर झोपतां ? ' ते उत्तरले, ' जमिनीवर कांबळें टाकून त्यावरच झोपतों. ' "

( ३ )" मी घरीं परत आलें. घरची इतर मंडळी मोकळ्या गच्चीवर खाटा टाकून निजली होती. पण मी तळमजल्यावरील खोलींत एक घोंगडी टाकली व त्यावर पडलों. डासांनीं माझ्या कानाभोंवतीं गुणगुणायला सुरवात केली. ते जणू मला म्हणत होते, खुळी ! येवढ्या कडक उन्हाळ्यांत ह्या खोलींत आणि तेंहि घोंगडीवर कोणाला तरी झोप येणें शक्य आहे काय ? मी एकदम उठून बसलें. चंद्राचे किरण खिडकींतून माझ्या खोलींत आले होते. मी सहाजिकच चंद्राकडे पाहिलें व त्याला म्हणालें, ' तूं इतका तेजःपुंज आहेस, तर त्यांच्या बराकीला प्रकाशित कर ना ! काय तुला कळत नाहीं, कीं ते सारे रात्र ह्या कडावरून त्या कडावर तळमळत अस्वस्थपणें घालवीत असतील? ' मीं पुन्हापुन्हा चंद्राकडे पाहिलें. पण माझ्या प्रश्नाचें उत्तर मात्र मला मिळूं शकलें नाहीं. मी झोपी जाण्याचा प्रयत्न केला. पण डास फार कडकडून चावूं लागले. मी त्यानंतर त्याच खोलींत झोपत असें. दोन दिवसांनीं वन्सं एकदम खोलींत येऊन म्हणाल्या, ' हें काय हो वहिनी, असं जिवावर कां उदार होता ? ' मी म्हणालें, ' छे हो ! मी कांहीं मरत नाहीं.' वन्सं म्हणाल्या, ' काय तर ! हीं सारीं मरणाचींच लक्षणं ! ' मीं विचारलें, ' म्हणजे जें कोणी असें झोपतें....' वन्सं उत्तरल्या, ' हो, हो तर ते सारे मरतात. ' माझ्या डोळ्यांत एकदम अश्रू आले. वन्संना फारच वाईट वाटलें. आपण कुठून बोललों असें त्यांना झालें. कशाला कुणाला दोष द्यायचा ? माझें नशीबच फुटकें आहे. त्यांना तुरुंगांत जर अशाच परिस्थितींत झोप घ्यावी लागते तर मी तरी दुसरें काय करणार ? "

(४) " पुन्हा एकदां मीं परवानगी मिळवून तुरुंगांत त्यांची भेट घेतली. विचारलें असतां ते म्हणाले कीं, ' मी फक्त एकदांच जेवत असतों. ' त्यांना खाव्या लागणाऱ्या भाकरीचा एक तुकडा मीं आपल्याबरोबर घरीं आणला व त्या दिवसापासून तसली भाकरी तयार करून मीहि एकदांच जेवीत असें. असे कितीतरी दिवस निघून गेले. खटला रोज सुनावणीला निघत असे. शेवटीं एक दिवस खोलींत मी त्यांच्याविषयीं विचार करीत बसलें असतां बाहेर रडण्याचा आवाज मला ऐकायला आला. माझें हृदय धड-धडत होतें. सर्वांगाला घाम सुटला होता. तरी पण मोठ्या धैर्यानें मी बाहेर आलें. वन्सं म्हणाल्या, 'दादाला फांशीची शिक्षा !......'

(५) " मी त्यांची शेवटची भेट म्हणून घ्यावयास पुन्हा एकदां दिल्लीच्या तुरुंगांत गेलें. तिथें कितीतरी तरुणांचें टवटवीत व उदात्त जीवन कुस्करलें जात होतें. मी माझ्या प्रभूला—हृदये-श्वराला—भेटलें. माझें हृदय दोनचार शब्द भेटण्याची इच्छा करीत होतें; पण माझ्या ओठामध्यें मुळींच शक्ती नव्हती. इतक्यांत ते गंभीर आवाजांत म्हणाले, ' जिवलगे, सारें विश्व मायेनें भरलें आहे. जन्माला येणारा प्राणी मरणार हें ठरलेलें आहे. इथें कोणी कोणाचा साथी नाहीं व कोणी कोणाच्या मदतीची आशा करूं नये. मी मातृभूच्या पवित्र वेदीवर आत्मबलिदान करीत आहें, याबद्दल तूं स्वतःला धन्य समज. ' माझ्या कानांनीं पतिदेवांचा संदेश ऐकला आणि डोळ्यांनीं अश्रूंना मोकळीक करून दिली. अश्रुप्रवाह थांबवून एकदां त्यांना डोळे भरून पहावें ही एकच माझी इच्छा होती. पण डोळ्यांतील आसवांनीं ती देखील पूर्ण होऊं दिली नाहीं. दुसरे दिवशीं फांशीची पूर्ण तयारी झाली. लोक म्हणत होते, ' बालमुकुंदांचा आत्मा त्यांना सदाचा सोडून

जाणार!' त्याअगोदर त्यांना भेटावें अशी माझी फार इच्छा होती. पण त्यांचें मृत शरीर देखील आम्हांला मिळूं शकलें नाहीं! मग प्रत्यक्ष भेट कुठची? यानंतर काय घडलें हें मला सांगतां येत नाहीं. गेल्या पंधरा दिवसापासून मी उपवास करीत असून ईश्वराची प्रार्थना करीत आहें. पण माझी अंतरींची इच्छा तृप्त होण्याची वेळ आली आहे असें मला वाटूं लागलें आहे."

भाईजी पुढें लिहितात, "इतकें बोलून रामरख्खी स्तब्ध राहिली. माझ्या डोळ्यांत अश्रू व अंगावर रोमांच उभे राहिले. यानंतर तिनें अन्नाचा एक कण व पाण्याचा एक थेंबसुद्धां तोंडांत घेतला नाहीं. बालमुकुंदांचा विचार करीत एकाच ठिकाणीं सतत अठरा दिवस ती शांतपणें जणू योगसमाधि लावून बसली होती. शेवटीं एक दिवस निरभ्र आकाशांत सूर्य तळपत असतां व सारी जनता आपआपल्या उद्योगांत निमग्न असतां ती आपल्या एकतान समाधींतून उठली. थंड पाण्यानें स्नान करून शुभ्र वस्त्र परिधान केल्यावर ती परत आपल्या जागीं जाऊन बसली. कांहीं वेळानें ती आपल्या स्वर्गस्थ पतिदेवाला उद्देशून म्हणाली, 'हे प्रभो! आपण माझी फार दिवस वंचना केलीत. परंतु आज मात्र मी आपणाला सोडणार नाहीं. आपणापासून मी आतां एक क्षण-भरहि दूर राहूं शकत नाहीं.' इतकें बोलून तिचाहि आत्मा इहलोक सोडून निघून गेला. लोक म्हणतात, बालमुकुंदांची पत्नी इहलोक सोडून निघून गेली. मी म्हणतों, 'बहरलेल्या गुलाबा-साठीं कोकिलेनें आत्मसमर्पण केलें. ही सत्य घटना आहे; कल्प-नेचें चेटूक नव्हे. सत्य आहे; सत्याभास नव्हे.'"

* * *

या खटल्यांत हरदयाळ व रासबिहारी या दोघांचींहि नांवें गुंतविलीं

होतीं. पैकीं हरदयाळ हे अमेरिकेंत असल्यामुळें ते ब्रिटिश सरकारचा हात पोहचण्याच्या कक्षेच्या बाहेर होते. रासबिहारींच्यावर वॉरंट सुटलें. त्यांना पकडून देण्यासाठीं साडेसात सहस्र रुपयांचें, लोभी लोकांची दृष्टी फाडून टाकणारें बक्षिस लागलें. पण मृत्युदंडाची ही नग्न तलवार सतत डोक्यावर लटकत ठेऊनहि रासबिहारी इ. स. १९१५ पर्यंत हिंदुस्थानांतच पाय गाडून काम करीत होते. त्यांचे मित्र व प्रख्यात क्रांतिकारक शचीन्द्रनाथ संन्याल यांच्याबरोबर ते काशी येथें होते व काशी येथें असल्यामुळेंच रासबिहारी सरकारच्या हातीं लागूं शकले नाहींत. एकदां तर त्यांच्यावर मोठाच प्रसंग आला होता. बनारसला बंगाली टोल्यांत राहत असतां आपल्या रासबिहारी बॉंबचें शिक्षण देत असत. बॉंबचा प्रयोग करून पहात असतांना दि १८ नोव्हेंबर १९१४ रोजीं त्याचा स्फोट झाला. त्यामुळें शचींद्र व बसू ह्या दोघांनाहि चांगल्याच जखमा झाल्या. या ठिकाणाहून पोलीस ठाणें केवळ पांच मिनिटांच्या रस्त्यावर आहे. पण केवळ त्यांच्या कौशल्यामुळें या निकटच्या घटनेचा पोलिसांना पत्ता लागूं शकला नाहीं. या बाबतींतील सरकारी समर्थन असें आहे कीं, बनारस हें अलेक्झांड्रियासारखें बकाली शहर असून त्या निरुंद पदमार्गांच्या शहरांत विविध जाती स्वतंत्र वास्तव्य करतात. बंगाली टोला ही स्वयंपूर्ण वसाहत असून बंगाली भाषा न जाणणाऱ्या उत्तरीय पोलिसांना बंगाली क्रांतिकारकांचा व त्यांच्या कार्याचा सुगावा सहसा लागूं शकत नाहीं. त्यामुळेंच सरकारला रासबिहारींचा पत्ता शेवटपर्यंत लागूं शकला नाहीं. रासबिहारींच्या समोर प्रयत्नाच्या मंदराचलाचें अपार घुसळण करूनहि हातीं यशाच्या अमृताऐवजीं अपयशाचें हलाहलच पडण्याचे प्रसंग अनेकवार आले;

ण त्यांच्या मुखावर नैराश्य, दुःख अथवा भग्नमनस्कतेची ाधी विकृतसुद्धां उमटलेली कधीं कोणी पाहिली नाहीं. पण चीन्द्र संन्यालांनीं आपल्या 'बंदिजीवन' नांवाच्या ग्रंथांत असें हिलें आहे कीं, " सदा प्रसन्नच राहणाऱ्या रासबिहारींनाहि ीं एक दिवस एकांतामध्यें मूक अश्रूपात करतांना पाहिलेलें आहे. या दिवशीं दिल्ली बॉंब कटाच्या खटल्याचा निकाल होऊन मीरचंद वगैरेंना वधस्तंभावर लटकवण्यांत आलें त्या दिवशीं ात्र मीं त्यांना एकांतामध्यें मूक अश्रुपात करतांना पाहिलें ! "

## ८ पंजाब ते बंगाल

या घटनेनंतर रासबिहारी बंगालची अनुशीलन समिति संघ- ित करून बंगाल ते पंजाबपर्यंत संघटनेची एक सुसूत्र साखळी त्पन्न करण्याच्या प्रयत्नास लागले. युरोपमध्यें या वेळीं महा- ुद्धाची सुरवात झालेली होती व समर्थ ब्रिटिश राज्यतंत्र उलथून ाडण्याच्या प्रयत्नाला जणूं ईश्वरानेंच ही सुवर्णसंधि आणून ेली असें रासबिहारी समजत होते. ज्या प्रस्थापित सरकारच्या िरुद्ध दंड थोपटून ते उभे होते, त्या सरकारच्या यंत्रसिद्ध लष्करी ामर्थ्याची त्यांना पूर्णपणें कल्पना होती, व निःशस्त्र हिंदुस्थान ा सामर्थ्यासमोर उठावणी करण्यांत यशस्वी ठरणार नाहीं याची ात्री असल्यामुळें तुल्यबल अशा दोन शक्तिकेंद्रांचा आपसांत हान् संघर्ष उत्पन्न झाल्यास इंग्लंडच्या शत्रूपक्षाकडून हिंदु- थानला नव्या यंत्रमय शस्त्रसामर्थ्याचें सहाय्य घेतां येऊन ब्रिटिश ाज्यतंत्र उखडून टाकतां येणें शक्य आहे, याची त्यांना जाणीव ोती. जर्मनीनें ब्रिटिशाविरुद्ध शस्त्र उपसल्यामुळें या सुवर्ण- संधीचा कसा फायदा घेतां येईल याचा ते विचार करूं लागले. ुरोपमध्यें हरदयाळांनीं जर्मन कौन्सलशीं संधान बांधलें व

अमेरिकेंतून पैसे, शस्त्रास्त्रसंपत्ति व लढाऊ माणसें भरभरून अनेक प्रचंड जलयानें हरदयाळांच्या प्रेरणेनें हिंदुस्थानचा किनारा जवळ करूं लागलीं.

## शचीन्द्रनाथ संन्याल

हे रासबिहारींचे उजवे हात होते. शचींद्रनाथांचा जन्म ५ जून १८९३ मध्यें कलकत्ता येथें झाला. १९०८ मध्यें वडील वारल्यानंतर १९०९ मध्यें तें बनारसला येऊन बंगालीटोला हायस्कूलमध्यें मॅट्रिकच्या वर्गांत नांव दाखल करून शिक्षण घेऊं लागले. शचींद्र १९०८ सालींच बंगालच्या सुविख्यात अनुशलिन समितीचे सदस्य झाले होते. काशीला येतांच त्यांनीं १९०९ मध्यें तेथें अनुशीलन समितीची शाखा स्थापन केली. प्रथम या शाखेचें नांव अनुशीलन समिती असेंच होतें; पण पुढें लवकरच बंगालमध्यें सरकारनें दमननीतीचा अंगिकार करून अनुशीलन समिति बेकायदा म्हणून घोषित केल्यानंतर बनारसच्या शाखेवर सरकारच्या वक्रदृष्टीची साडेसाती फिरूं नये म्हणून शचींद्रांनीं 'युवक संमेलन, काशी' असें तिचें नामांतर केलें. यानंतर समितीच्या आणखी शाखा वाढवाव्या व बंगालच्या कार्यक्षम समितिकेंद्राशीं अधिक जिव्हाळ्याचे संबंध प्रस्थापित करावे म्हणून शचींद्रनाथ प्रयत्नशील बनले. याच उद्देशानें १९११सालच्या जून महिन्यांत पांडेचरी येथें जाऊन त्यांनीं योगींद्र श्री अरविंद घोष यांची भेट घेतली. पांडेचरीहून बनारसला परत आल्यानंतर अमेरिकेमध्यें प्रस्थान करावें असें शचींद्रांच्या मनानें घेतलें. त्यासाठीं ते मुंबईस गेले देखील; पण मुंबईला असतांना बारिसाल षड्यंत्राचें वृत्त कानावर येऊन हिंदुस्थानांतच आपली अधिक गरज आहे असें त्यांना आढळून आलें; व ते पुनश्च बंगाल-

मध्यें परत आले. बंगालमध्यें १९१२ सालीं मोतीलालराय या नांवाच्या एका गृहस्थाच्या द्वारां शचीन्द्राचा रासबिहारींशीं परिचय झाला.

रासबिहारींनीं अत्यंत कुशलतेनें शचींद्रनाथांचा उपयोग करून घेऊन आपल्या या अज्ञातवासाच्या काळांत सरकारी क्रोधाची व गुप्तचरांची नंगी समशेर डोक्यावर लटकत असतांनाही बंगाल ते पंजाबपर्यंत संघटनेचें मजबूत जाळें अत्यंत कुशलतेनें विणलें. रासबिहारींच्या कल्पनेप्रमाणें महायुद्ध १९१४ मध्यें सुरवात होऊन, अमेरिकेकडून ज्या वेळीं हरदयाळांच्या प्रेरणेनुसार शीखांचीं तारवेंच्या तारवें येऊं लागलीं, त्या वेळीं रासबिहारी त्यांना या विशाल विप्लववादी संघटनेंत ओवण्याचा प्रयत्न करूं लागले. कोमागोटामारूवरील संपत्ति व माणसें मिळवण्याचा रास-बिहारींनीं शचींद्रनाथांच्या द्वारां पुष्कळ प्रयत्न केला. पण सरकार या तारवाच्या बाबतींत पूर्वींपासूनच सचेत असल्याकारणानें हा प्रयत्न यशस्वी होऊं शकला नाहीं. उत्तर अमेरिका व कॅनडा येथून निरनिराळया टोळयांनिशीं या वेळीं कमींत कमी सात हजार शीख तरी हिंदुस्थानांत येऊन पोहोंचलेले होते. त्यांत पुष्कळ लोक १९१४ च्या Ingress ordinance Act च्या अनुसार तुरुंगाच्या कालकोठडींत कोंबण्यांत आले. ज्यांना प्रत्यक्ष तुरुंगांत न घालतां नजरबंद करण्यांत आलेलें होतें, त्यांना परवानगीवांचून घराबाहेर पाऊल टाकण्याचीहि चोरी होती. त्यामुळें त्यांतले अनेक लोक आपल्या संसारांत फसले व उर्वरित विप्लवाच्या कार्यास लागले. नुसते उत्साही तरुणच यांत समाविष्ट होते असें नव्हे; तर भाई निधानसिंह, बाबा सोहनसिंह, कालसिंह, सरदार केसरसिंह, यांच्यासारखीं पन्नाशी उलटून गेलेलीं माणसेंही सरदार

**भगवानसिंह** यांच्या नेतृत्वाखालीं या देशस्वातंत्र्याच्या महनीय कार्यांत भाग घ्यावयास अग्रेसर म्हणून उभीं राहिलीं होतीं. झांशीचे पंडित परमानंद (अंदमानमध्यें 'छोटे परमानंद' या नांवानें विख्यात असलेले गृहस्थ) हेही जपानमधून येऊन या टोळीला मिळाले. ही सर्व मंडळी पूर्वीपासून लष्करांत काम करीत आलेली असल्यामुळें अस्त्र-शस्त्रांचा त्यांचा अभ्यास अतिशय उत्तम होता. खरेंच सांगावयाचें तर या पंजाबी लोकांना ही जी सुविद्या होती ती जर बंगाली क्रांतिकारकांना असती तर त्यांनीं काय प्रलयंकर तांडव गाजविलें असतें तें सांगतां येत नाहीं. अमेरिकेंतून आलेल्या या लोकांपैकीं कर्तारसिंह व **पंडित जगतराम** हे अमेरिकेमधील हरदयाळांच्या प्रख्यात गदर पत्राच्या संपादक विभागांत होते. पुढें पंडित जगतराम यांना खटल्याच्या वेळीं न्यायमूर्तींनीं जेव्हां असें विचारलें कीं, "तुम्ही या देशांत काय म्हणून आलांत?" त्यावर त्यांनीं ताडकन् उत्तर दिलें कीं, "काय पण प्रश्न! अहो, हा आमचाच तर देश आहे! इथें का यायला कुणाच्या परवानगीची आम्हांला गरज लागायची आहे? आईच्या कुशींत आम्हीं केव्हां अन् कसें शिरायचें हें आमचें आम्हीं ठरवायचें आहे. तुम्ही आम्हांला हें विचारणार कोण?" **बागी कर्तारसिंह** हे या वेळीं केवळ १८।१९ वर्षांचे पोरसवदा तरुण होते. कर्तारसिंह सन १९१२ मध्यें ज्या वेळीं सॅनफ्रान्सिस्को येथें होते त्या वेळीं हिंदी कामकऱ्यांचा होत असलेला अपमान पाहून व त्यामुळें चीड येऊन ते गदर पक्षांत समाविष्ट झाले. गदर पत्राचे कांहीं अंक त्यांनीं हॅंड प्रेसवर स्वतःच काढले होते. त्यानंतर न्यूयॉर्क येथील विमानांच्या एका कारखान्यांत नोकरी पतकरून त्यांनीं विमानविद्येचें शिक्षण घेतलें. १९१४ च्या सप्टेंबरमध्यें त्यांनीं जपानच्या

किनाऱ्याकडे प्रख्यात कोमागाटामारूचे नायक बाबा गुरुदितसिंग हे जात असतांना, मुद्दाम जहाजावर जाऊन त्यांची भेट घेतली. बागी कर्तारसिंग अखरीस १९१४ च्या सप्टेंबर महिन्याच्या १५ तारखेस सायंकाळीं निप्पोन मारू जहाजाच्या द्वारें कोलंबो येथें येऊन पोहोंचले, व तेथून निर्विघ्नपणें पंजाब प्रांतांत येऊन दाखल झाले. कर्तारसिंहांच्या हृदयांत बंडाचे विचार अतिशय प्रदीप्तपणें उसळी घेत होते. येतांच त्यांनीं प्रथम बंगालमध्यें कलकत्ता येथें जाऊन तेथील अनुशीलन समितीचे मुख्याधिकारी यतींद्रनाथ मुखोपाध्याय यांची भेट घेतली. त्यांनीं कर्तारांना, रासबिहारींना भेटावयास सांगून भारतीय क्रांतिकारकांचें केंद्रस्थान दाखविलें. यतीन्द्रनाथांचें मार्गदर्शन व एकंदर परिस्थिति यांचा विचार कर्तारसिंहानीं करून रासबिहारींनींच स्वत: पंजाबमध्यें यावें अशी योजना आंखली. त्यांनीं रासबिहारींना आणायला म्हणून कांहीं विश्वसनीय माणसें बनारसला पाठविलीं. पण कर्तारसिंहाचा उत्साह रासबिहारींना कौतुकास्पद वाटत असला तरी त्यांचें पोरपण व क्रांतीच्या महान् कार्याच्या नेतृत्वाचा त्यांना असलेला तोटका अनुभव लक्षांत घेऊन त्यांनीं एकदम स्वत: न जातां एकंदर परिस्थितीचें मूल्यमापन करण्यासाठीं म्हणून प्रथम शचींद्रनाथ संन्याळांना तेथें पाठवावयाचें ठरविलें.

## ९ शचीन्द्रांची पंजाबयात्रा

रासबिहारींच्या आज्ञेनुसार १९१४ च्या नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीस शचींद्रनाथ पंजाबमध्यें गेले. लुधियाना येथें त्यांचा कर्तारसिंह यांच्याशीं परिचय झाला. शचीन्द्र जालंदरच्या स्टेशनावर उतरून संकेतस्थळ म्हणून ठरलेल्या एका जवळच्याच बगीच्यांत शिरले. तेथें कर्तारसिंह, पृथ्वीसिंह, रामसरनदास तलवार,

अमरासिंह इत्यादि व्यक्ती रासबिहारींची मार्गप्रतीक्षा करीत होत्या. पण रासबिहारी न येतां त्यांच्याऐवजीं शचीन्द्रांना आलेलें पाहून ही मंडळी किंचित् निराश झाली. अखेरीस त्यांनीं शचीन्द्रांना सारी परिस्थिति निवेदन केली. शीख लष्कराच्या बाबतींत स्वत:ला विशेष आशा असल्याचें या बैठकींत कर्तारसिंहानें त्यांना बोलून दाखविलें. शचींद्रांनीं या मंडळींना क्रांतिकारक संघटनेच्या बाबतींत कांहीं विशेष गोष्टी व घटना यांच्याकडे बारकाईनें लक्ष पुरवावयास सांगून कांहीं रिव्हाल्व्हर्स व काडतुसें कर्तारसिंहाच्या स्वाधीन केलीं. शचीन्द्रांनीं या सुमारास काशीला बॉंब बनविण्याचा अतिशय सुंदर व व्यापक प्रमाणावर प्रबंध केलेला होता. कर्तारसिंहांनीं बॉंबच्या बाबतींत पृच्छा करतांच शचीन्द्रांनीं सांगितलें कीं, "एक बॉंब तयार करावयास सोळा रुपये खर्च येतो. खर्चाची व्यवस्था होत असल्यास हवे तितके बॉंब्स पाठवितां येणें शक्य आहे, त्याची काळजी नको." या बैठकीनंतर शचींद्र लाहोर येथें गेले. पंजाबांतील एकंदर संतप्त वातावरण व गदरपक्षाची सन्नद्धता पाहून त्यांच्या मनावर अतिशय प्रभाव पडला.

पंजाबच्या एकंदर परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करून आपल्या या संचाराचा वृत्तांत निवेदन करण्यासाठीं म्हणून ते लवकरच बनारसला त्यांचे आवडते नेते रासूदा अथवा रासबिहारी यांच्याकडे आले. शचींद्रांनीं रासबिहारींना पंजाबची सारी परिस्थिति निवेदन करून असें सांगितलें कीं, "पंजाबमध्यें उत्पन्न झालेल्या या नव्या शक्तीला शीघ्रातिशीघ्र संयत, संयमित व संघटित न केलें तर भावनाशील शीख लोक भलत्याच वेळीं बंडाचें निशाण उभारून सारी योजना धुळीस मिळवितील व सारी शक्ति अन्

सारे प्रयत्न फुकट जातील. कारण कीं, त्यांच्याजवळ शक्तिसंचय नि उत्साह हवा तितका असला तरी नेतृत्व, स्थानप्रयत्नविवेक व संघटन यांचें कल्पनातीत दारिद्र्य आहे." शचींद्रांची खरी इच्छा या वेळीं रासबिहारींना पंजाबांत पाठवून देऊन स्वतः बंगालमध्यें जाण्याची होती. पण रासबिहारींनीं त्यांना बंगालच्या रोखानें मुळींच वळूं दिलें नाहीं. वास्तविक या वेळीं शचींद्रावर चोवीस तास गुप्तचरांची तीक्ष्ण दृष्टि खिळलेली होती आणि तरीही ते त्यांच्या डोळ्यांत धूळ फेकून आपलें काम निर्वेधपणें करीत होते. पंजाबचा सारा समाचार ऐकल्यानंतर रासबिहारी कांहीं वेळ स्तब्ध बसून राहिले व नंतर त्यांनीं शचींद्राना सांगितलें कीं, "आतां पंजाबमधील लष्करांत प्रवेश करून घेऊन सैनिकांना उठावणीचे पाठ देण्याची आवश्यक वेळ आलेली आहे. तसेंच बंगालचे नेते यतींद्र यांनाही पंजाबच्या या तयारीचें वृत्त कळविणें अत्यंत अवश्य आहे."

इकडे पंजाबमध्यें या वेळीं अमेरिकेहून जगतसिंह व रंगासिंह आणि कॅनडामधून वीरासिंह व बंतासिंह हे गदरपक्षाचे नेते येऊन दाखल झाले. त्यांच्या मागोमाग केहरसिंह, जीवनसिंह व शांघायहून **डॉ. मथुरासिंह** हेही येऊन पोहोचले. डॉ. मथुरासिंह झेलम येथील रहिवासी असून १९१३ सालीं शांघायमध्यें प्रॅक्टिस करीत असत. डॉक्टर मथुरासिंह प्रथम प्रॅक्टिसच्या निमित्तानें कॅनडा येथें जावयास निघाले होते. पण इमिग्रेशन ॲक्टाच्या तडाख्यानें तेथील गोऱ्या वसाहतवाल्यांनीं त्यांची रवानगी परत शांघायला केली. पुढें या इमिग्रेशन ॲक्टवरूनच जें कोमागाटा-मारूचें प्रकरण गाजलें त्याचे खरे उत्पादक डॉ. मथुरासिंह हेच होते. त्यांनींच बाबा गुरुदितसिंगांना या प्रकरणाची स्फूर्ति दिली.

पुढें दिनांक चुकल्यामुळें डॉ. मथुरासिंह ठरल्याप्रमाणें सिंगापूरला येऊन दाखल न होऊं शकल्याकारणानें प्रत्यक्ष कोमागाटामारू प्रकरणांत ते गोवले गेले नाहींत. तरी पण त्यांनीं शांघायला राहूनच गदरच्या प्रसारास प्रारंभ केला. गदरचीच नक्कल असलेलें पण वेगळया नांवाचें एक वृत्तपत्र काढून ते शांघायला प्रचार करीत असत. कोमागाटामारू ज्या वेळीं हिंदुस्थानाकडे परतलें, त्याच सुमारास डॉ. मथुरासिंह हेही पंजाबमध्यें आले. पं. जगतराम यांनीं अमेरिकेहून आल्यानंतर स्वत:जवळचे डॉलर्स भाई परमानंदांस देऊन त्यांच्या जवळूनच रुपये घेतले. यानंतर पंडितजींना बरेचसे रुपये बरोबर देऊन काबूलच्या मार्गानें शस्त्रास्त्रें खरेदी करून आणण्यासाठीं म्हणून पाठविण्यांत आलें. पण दुर्दैवानें त्यांना पेशावरलाच अटक झाली. फरासखान्यांत नेल्यावर त्यांच्या जवळ डॉलर्सच्या ऐवजीं रुपये कसे आले म्हणून पोलिस अधिकाऱ्यांनीं चौकशी केली असतां पंडितजींनीं सरळ भावानें भाई परमानंदांचें नांव सांगितलें. मायकेल ओड्वायर यांना या रिपोर्टानंतर विश्वास वाटूं लागला कीं, भाई परमानंद कसल्या तरी महान गुप्त कटाच्या योजनेंत आहेत. लगेच गुप्तचरांचे तीक्ष्ण नेत्र त्यांच्यावर चोवीस तास पाळत ठेवूं लागले.

या सुमारास रासबिहारींच्या सूचनेनुरूप शचींद्रांनीं बनारस येथील सेनेमध्यें शिरकाव करून घेऊन संबंध प्रस्थापित केले. या वेळीं पूर्वबंगाल्यांतील क्रांतिकारक संघटनांचें जाळें अतिशय व्यापक प्रमाणावर विणलें गेलें होतें. या बंगाली क्रांतिकारक समित्यांना व त्यांच्या नेत्यांना पंजाबांतील तयारीची नीट कल्पना द्यावी म्हणून रासबिहारींनीं शचीन्द्रांची बंगालमध्यें पाठवणी केली. बंगालमध्यें जाऊन पोहोंचतांच शचींद्रांनीं तेथील क्रांतिकारकांचे

नेते यतींद्रनाथ मुखोपाध्याय ( प्रख्यात जतीन् मुकर्जी ) व इतर नेते यांची भेट घेऊन त्यांना पंजाबमधील सर्व वृत्त सांगितलें. प्रथम वंगीय क्रांतिकारकांना शचींद्रांचें हें म्हणणें खरेंच वाटेना. त्यांना वाटे, जर हें सारें खरें असलें तर हिंदुस्थान स्वतंत्र व्हावयास फक्त कांहीं दिवसांचाच काय तो अवधि आहे, असें समजायला हरकत नाहीं. अखेरीस शचींद्रांनीं त्यांची या बाबतींत खात्री पटवून दिल्यानंतर, बॉंबगोळे अधिक प्रमाणावर तयार करून त्यांची शाखाशाखांमधून व्यवस्थित पेरणी करण्याबद्दल यतींद्रांनीं त्यांना सुचविलें, व इतर कांहीं बाबीसंबंधीं बोलणें करून यतींद्र परत बनारसला आले. आतां शचींद्रांच्या सेनेमधील परिचयाची वाढ इथपर्यंत निश्चितपणें झाली होती कीं, ते हवे तेव्हां हव्या त्या बराकींत जाऊं येऊं शकत असत. दिल्लासिंह या नांवाचा एक हवालदार त्यांच्याशीं विशेष लगट करण्याचा प्रयत्न करी. पण शचींद्रांना हा गृहस्थ पसंत न आल्याकारणानें त्यांनीं एका विशिष्ट अंतराच्या पलीकडे त्याच्याशीं संबंध येऊं दिले नाहींत. त्याला टाळून त्यांनीं सेनेंत पत्रकें व खासगी संभाषणें यांच्या द्वारें रासबिहारींच्या इच्छेला मूर्त स्वरूप द्यावयास प्रारंभ केला.

## १० विष्णु गणेश पिंगळे.

अमेरिकेहून जे अनेक लोक हिंदुस्थानांत आले त्या सर्वांत विष्णु गणेश पिंगळे यांचें आगमन ही कार्यदृष्ट्या अतिशय महत्त्वाची गोष्ट होती. एस. एस. सलामिस नांवाच्या बोटीनें १९१४ च्या नोव्हेंबर महिन्यांत पिंगळे निर्विघ्नपणें हिंदुस्थानांत येऊन पोहोंचले. पिंगळे यांच्या शरीराचा वर्ण सुवर्णासारखा, कातडी नितळ, बांधा सामान्य माणसापेक्षां उंच, पण अतिशय बलिष्ठ, डोळे किंचित् पिंगट व दोन समोरचे दांत किंचित् समोर आलेले;

असें त्यांना पाहिलेलीं माणसें त्यांचें वर्णन करतात. त्यांच्या चेहऱ्यावरून, विशेषतः तीक्ष्ण नि अंतर्भेदी दृष्टीवरूनच त्यांच्या सूक्ष्म बुध्दीचा परिचय होत असे. कोणतीही व्यक्ती परिचय होतांच जणूं कांहीं अंतःप्रेरणेनेंच भारली जावी अशी अपूर्व आकर्षणशक्ति त्यांच्या व्यक्तित्वांत होती. प्रख्यात क्लीव्हलँड साहेब एकदां सहज बोलतांना धर्मवीर डॉ. मुंजे यांना असें म्हणाले होते कीं, " मीं पुष्कळ भारतीय क्रांतिकारक पाहिलेले आहेत. पण विष्णु गणेश पिंगळे यांची स्मृति माझ्या हृदयपटलावरून कधींही पुसली जाणें शक्य नाहीं. त्यांच्याइतकी दुर्लभ मानवी गुणसमुच्चयाचें, चारित्र्याचें अन् उदात्ततेचें निधान असलेली व्यक्ति मी दुसरी पाहिली नाहीं. मीं त्यांना वांचविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण मीं सांगितल्यापैकीं एकही गोष्ट मान्य करावयास ते तयार होईनात. मोडून जाईन पण वांकणार नाहीं अशी त्यांची ताठर वृत्ति होती. स्वतःचा प्राण वांचविण्यापेक्षां सहकाऱ्यांबरोबरचें मरण मला अधिक पसंत आहे, असें ते म्हणाले. ज्या दिवशीं ते फांसावर चढले त्या दिवशीं माझ्या डोळ्याचें पाणी खळलें नाहीं. " डॉक्टरसाहेबांना हें सारें सांगत असतानांही क्लीव्हलँड साहेबांचा कंठ भरून आला होता. असो.

पिंगळे जे आले ते आपली मातृभूमि महाराष्ट्र व तेथील आपले कुटुंबीय यांची भेटही न घेतां सरळ पंजाबकडे रवाना झाले. ( पिंगळे यांचे वृध्द वडील बंधु श्री. केशव गणेश पिंगळे हे अजून हयात असून ते तळेगांव-ढमढेरे येथें फळांचा व्यापार करीत असतात. ) पंजाबच्या एकंदर परिस्थितीचें निरीक्षण करून बॉंबगोळे आंणण्यासाठीं म्हणून त्यांनीं आपला मोर्चा बंगालकडे वळविला. बंगालमध्यें येतांच तेथील अनुशीलन समितीच्या सर्व शाखा, त्यांचा

नेते व विशेषत: यतींद्रनाथ मुखोपाध्याय यांची भेट घेऊन त्यांनीं बंगाली नेत्यांना पंजाबच्या परिस्थितीची नीटशी कल्पना दिली व गदरच्या संभूय समुत्थानासाठीं म्हणून पंजाब ते बंगालपर्यंत संघटनेची एक सुसूत्र व एकाच दिवशीं नि एकाच क्षणीं उठावणी करणारी सांखळी निर्माण करण्याची आवश्यकता प्रतिपादिली. पिंगळे यांनीं अमेरिकेस जाण्यापूर्वी यात्वेच्या निमित्तानें सारें भारतवर्ष साधुवेषांत पायाखालीं तुडविलें असल्यामुळें त्यांना हिंदुस्थानचा कोपरान् कोपरा माहीत होता.वंगीय नेत्यांनीं त्यांना सांगितलें कीं, त्यांची सुसूत्र संघटनेची कल्पना प्रत्यक्षांत आलेली असून क्रांतियुध्दाचे खरे नेते रासबिहारी बसू हे आहेत. हवे तर त्यांची भेट घेऊन पिंगळे यांनीं पुढचे बेत ठरवावेत. पिंगळ्यांनीं बंगाली क्रांतिकारकांना बॉंबगोळ्याची मागणी केली. त्यावर त्यांना असें उत्तर मिळालें कीं, बंगालमध्येंच बॉंबगोळयांचा पुरवठा रासबिहारींच्या निवासस्थानाहून म्हणजे बनारसहून होत असल्याकारणानें पिंगळे हे तेथें गेल्यास त्यांची कटाच्या मुख्य नेत्याचीही भेट होईल व त्यांना हवे तितके बॉंब गोळेही मिळतील. या बाबतींत प्रथम त्यांनीं शचींद्रनाथ संन्याल यांची भेट घ्यावी म्हणजे त्यांचा पुढील कार्यभाग सुकर होईल.

बंगाली क्रांतिकारकांच्या सूचनेनुसार पिंगळे यांनीं आपल्या कांहीं पंजाबी मित्रांसमवेत शचींद्रांची भेट घेतली. पिंगळ्यांना बंगाली व पंजाबी भाषा सफाईनें बोलण्याचा अभ्यास असल्याकारणानें दोन्ही प्रांतांतील लोकांना ते परके असे वाटतच नसत. शचींद्रांनीं बनारस येथील आपल्या सर्व सहकाऱ्यांशीं त्यांचा परिचय करून देऊन रासबिहारींची व त्यांची गांठ घालून दिली. पिंगळ्यांचा परिचय होतांच रासबिहारींना अतिशय आनंद वाटला.

आपल्याला हवा होता तसा सहकारी लाभला असें पाहून रास-बिहारींनीं त्यांना एक दोन दिवस स्वत:जवळ ठेवून घेतलें.पंजाबची तयारी जरी व्यापक प्रमाणावर असली तरी कर्तारसिंह, पृथ्वी-सिंह, यांच्या अल्लड नि पोरसवदा उत्साहामुळें व पंजाबमधील समर्थ नेतृत्वाच्या अभावामुळें अवेळींच उठावणी होऊन क्रांति फसण्याचा संभव आहे, हें स्वत:ला वाटत असलेलें भय रास-बिहारींनीं त्यांना बोलून दाखविलें. पिंगळ्यांनीं स्वत: या दृष्टीनें एकदां पंजाबचें निरीक्षण करावें अशी इच्छा रासबिहारींनीं व्यक्त करतांच पिंगळ्यांनीं ती जबाबदारी स्वीकारली. एक आठवडाभर पंजाबांत संचार करून पिंगळे परत बनारसला आले. त्यांनीं आपला अहवाल रासबिहारींना सादर केल्यानंतर एक नक्की योजना घेऊन रासबिहारींनीं पुनश्च पिंगळे व शचींद्र यांना जोडीनें पंजाबांत जावयास सांगितलें.

शचीन्द्र व पिंगळे दोघेही उत्तर हिंदुस्थानी व्यापाऱ्यांचा पोशाख करून सफरीच्या बतावणीनें पंजाबांत आले.प्रथम ते अमृ-तसर येथील गुरुद्वारांत आले. तेथें पिंगळ्यांनीं शचीन्द्रांचा परि-चय **मूलासिंह** नांवाच्या एका व्यक्तीशीं करून दिला. मूलासिंह हा कांहीं दिवस शांघाय येथील पोलीस विभागांत नोकरींत असतांना त्यानें त्या ठिकाणीं दोनदां यशस्वीपणें हरताळ पार पाडले होते. शचीन्द्रांनीं पंजाबांतील चळवळीच्या सुसूत्रतेसाठीं एक केन्द्र स्थापन करण्याची आवश्यकता प्रतिपादन करतांच मूला-सिंहानें केन्द्राचा भार स्वत:च्या शिरावर घेण्याची तयारी दर्शविली. त्यानें असेंही सांगितलें कीं, बंडाचें निशाण उभारलें जातांच पंजाबी सेनांनीं राजसत्तेविरुद्ध हत्यार उपसण्याचें वचन दिलेलें आहे.पण मूलासिंहाच्या भपकेबाज गप्पावर विश्वास ठेवून त्याच्या-

वर केन्द्राचा भार सोपविण्यांत अतिशय मोठी चूक झालेली आहे हें शचीन्द्रांच्या लवकरच ध्यानांत आलें. यानंतर पिंगळ्यांना घेऊन ते मुक्तेश्वरच्या मेळ्यांत कांहीं लोकांना भेटावयास्तव म्हणून गेले. तेथून ते गुरुद्वारांत परत आले.

त्या वेळीं कर्तारसिंह, अमरसिंह इत्यादि मंडळी त्यांची वाटच पहात होती. शचींद्रांना आलेले पाहून प्रसन्न अंत:करणानें स्मित करीत बागीकर्ता त्यांना म्हणाले, " बोला महाशय, रास-बिहारी स्वत: कधीं येणार आहेत? " शचीन्द्र उत्तरले, " बस्स, आतां त्यांचीच तर पाळी आहे. आपल्या कामाला थोडें अधिक व्यवस्थित, संयत नि उग्र स्वरूप येऊं द्या व त्यांच्या गुप्ततेनें राहाण्याच्या जागेचा खात्री पटविण्याजोगा बंदोबस्त करा, कीं त्यांना यायला वेळ लागणार नाहीं." केन्द्रस्थानाची आवश्यकता प्रतिपादन करीत असतां मूलासिंहाशीं झालेलें सारें बोलणें, त्यानें पतकरलेली जबाबदारी व स्वत:ला त्याच्याविषयीं वाटत असलेला अविश्वास शचीन्द्रांनीं कर्तारांना बोलून दाखविला. रासबिहारींच्या साठीं म्हणून लाहोर व अमृतसर अशा दोन्ही ठिकाणीं दोन दोन घरें घेण्यांत आलीं. याच सुमारास अमेरिकेहून आणखी एक शीखांचें दल अमृतसर येथें येऊन पोहोचलें. या दलानें बॉंब गोळ्यासाठीं म्हणून पहिल्या भेटींतच ५०० रु. शचीन्द्राच्या ताब्यांत दिले. या दिवसांत कर्तारसिंह अद्भुत परिश्रम करीत होते. रोज प्रात:काळीं सायकलस्वार होऊन ते ४०|५० मैलाचा फेरफटका करीत गावोगांव जात असतां खेड्यापाड्यांतून पुरेसा प्रचार केल्यानंतर त्यांच्या ही गोष्ट ध्यानांत आली कीं, अजून सैनिकांमध्यें विद्रोहाचा अवश्य तो प्रचार व्हावयाचा आहे. त्यांनीं युक्तीनें सैन्यांत प्रवेश मिळवून तेथें धडाक्यानें आपलें काम प्रारंभ

केलें. आज ' मोगा ' येथें गुप्त समितीची सभा आहे, तर तेथें कर्तारसिंह उपस्थित आहेतच. उद्यां लाहोर येथील कॉलेजांत विद्यार्थ्यांचीं प्रमुख टोळकीं गांठून तेथें त्यांचा धडाक्यानें प्रचार सुरू असेच; परवां फिरोजपूर येथील लष्करी छावणींत शिरून तेथें विद्रोहाचा ज्वालाग्राही प्रचार करीत आहेतच, केव्हां बॅाब गोळे आणण्यासाठीं ते काशीस रवाना झाले आहेत, तर केव्हां हत्यारें आणण्यासाठीं कलकत्त्याची यात्रा करीत आहेत. असा त्यांचा तुफानी संचार सारखा सुरू होता. शचीन्द्र व पिंगळे या वेळीं एक आठवडाभर पंजाबांत राहून नंतर काशीला परत आले.

## ११ कर्तारसिंहांचीं अद्‌भुत कृत्यें

वस्तुतः पंजाबांतील लोकांची कार्य करण्याची पद्धति गुप्ततेच्या दृष्टीनें इतकी कच्ची होती कीं, लवकरच त्यांच्यापैकीं पुष्कळांच्या नांवानें वॉरंटें निघालीं. एक दिवस कर्तारसिंहांच्यावर चमत्कारिक प्रसंग ओढवला होता. एका गांवाला ते आहेत असें कळतांच पोलिसांनीं वेढा दिला. कर्तार गांवाच्या जवळच उपस्थित होते. पोलीसांनीं गांवाला वेढा देऊन आपला शोध चालविला आहे असें कळतांच ते तडक सायकलस्वार होऊन गांवांत आले व पोलिसांच्या समोरूनच वावरूं लागले. पोलिसचे अधिकारी त्यांना ओळखत नव्हते याची त्यांना पूर्ण जाणीव होती; व म्हणूनच या साहसानें ते संकटांतून पार वांचले; पण जर याऐवजीं गांवांत न येतां त्यांनीं बाहेरूनच पळून जाण्याचा प्रयत्न केला असतां तर ते पोलिसांनीं सारे रस्ते रोखले असल्याकारणानें निश्चितपणानेंच पकडले गेले असते.

एकंदर कार्याचा व्याप इतका वाढला होता कीं, अमेरिकेहून आणलेले अन् देणग्यांच्या द्वारें मिळालेले पैसे अपुरे पडूं लागले.

उघडपणानें या कामासाठीं अधिक देणग्या मागणें अथवा वर्गणीच्या द्वारानें पैसा वसूल करणें अशक्यच होतें. अशा स्थितींत काय करावें म्हणून विचार करण्यासाठीं गुप्त समितीची एक सभा भरविण्यांत आली असतां त्यांत कर्तारसिंहांनीं दरवडे पाडून पैसे गोळा करण्याची सूचना केली. ही सूचना ऐकतांच सारी सभा कांहीं वेळ तटस्थ होऊन गेली. एक मनुष्य कर्तारसिंहांना म्हणूं लागला कीं, "आपण दरवड्यासारखीं अनीतीचीं कृत्यें केलीं तर लोकांची आपणांविषयीं सहानुभूतीची भावना नष्ट होईल व आपल्या कार्यासाठीं जर आपण या अनीतीच्या मार्गानें पैसा मिळविला तर आपल्या कार्याचें नैतिक अधिष्ठानहि नष्ट होईल. भरतभूमीच्या उद्धाराच्या हेतूनें का होईना, पण तिच्याच पुत्रांना लुटणें कांहीं चांगलें नव्हे." हा आक्षेप ऐकतांच कर्तारसिंहाचा संताप उफाळून वर आला नि निखाऱ्यासारख्या आपल्या पिंगट नेत्रांतून ठिणग्यांचा वर्षाव करीत ते म्हणाले, "तुम्हांला इतकेंहि कळूं नये काय कीं, गुलामगिरीचे पाश भोंवतीं आवळलेल्या राष्ट्रांतल्या लोकांचें एकच खरें कर्तव्य असतें व तें म्हणजे परसत्तेचीं बंधनें तोडून स्वतंत्र होणें. गुलामांना स्वातंत्र्याकडे नेणारें प्रत्येक साधन नीतिमानच असतें. ज्यांना देशाच्या स्वातंत्र्याविषयीं मुळींच आस्था नाहीं त्यांचा पैसा चैनीच्या पापांतच खर्च होणार आहे. त्यांतला थोडासा आपण या कार्यांत खर्च केला तर त्यांना उलटें पुण्यच लागणार आहे." कर्तारांच्या या युक्तिवादानें क्रांतिकारक दरवडे पाडावयास सिद्ध झाले. त्यांतल्या कांहीं वयोवृद्ध व्यक्तींनीं यासंबंधांत भाई परमानंदांचाहि विचार घेणें अवश्य आहे असें त्यांना सुचविलें. त्याबरोबर त्यांनीं स्वतःच भाईजींना विचार-

ण्याची कामगिरी पत्करली. ते हें निश्चित ओळखून होते कीं, भाईजी जसे या प्रकाराला उघड उघड संमति देणार नाहींत, त्याचप्रमाणें दुसरें कांहीं सुचवूंहि शकणार नाहींत. अशा स्थितींत त्यांना विचारून अकारण अपशकुन करून घेण्यापेक्षां कांहीं न विचारणें काय वाईट ? भाईजींना कांहींच न विचारतां दुसऱ्या दिवशीं कर्तारसिंहानीं आपल्या त्या विचारमग्न सहकाऱ्यांना स्वच्छ असें सांगितलें कीं, " मी भाई परमानंदांना काय विचारावयाचें तें विचारून आलेलों आहें. त्यांची या गोष्टीला पूर्ण संमति असून त्यांचेंहि मत माझ्याचसारखें आहे. मात्र पन्नास लोक एकच गोष्ट विचारावयास गेले तर भाईजींना असें वाटेल कीं, या लोकांना प्रत्यक्ष कांहींच करावयाचें नसून नुसती बडबड मात्र करावयाची आहे. या बडबडीनें व्यर्थ कार्यनाश होईल; म्हणून भाईजी स्वच्छ नकार देतील." भाईजींचें हें मत व कर्तारांचें त्यावरील भाष्य ऐकतांच सर्वांचींच तोंडें गप्प झालीं.

अंबाला जिल्ह्यांतील लारू गांवचे निवासी व या मंडळींचे एक नेते प्रख्यात **सरदार पृथ्वीसिंह** यांच्यावर या वेळीं वॉरंट निघालें होतें. ८ डिसेंबर १९१४ रोजीं त्यांची रस्त्यांत एका ओळखीच्या पोलिस ऑफिसरशीं गांठ पडली. पण पृथ्वीसिंह, तो जवळ येऊं लागतांच, त्याला एक जोराची गचांडी देऊन पहातां पहातां अदृश्य झाले. असो.

कर्तारसिंहांनीं ठरविलेल्या या बेतानुरूप १७ डिसेंबर रोजीं हिसार जिल्ह्यांतील पिपी या गांवीं एका ब्राह्मण सावकाराच्या घरीं दरवडा घालण्यांत आला. या दरवड्यांत बावीस हजार रुपये एक हातीं रक्कम क्रांतिकारकांच्या हातांत पडली. डिसेंबर महिन्याच्या उत्तरार्धांत पंजाब सरकारनें पंजाबची एकंदर परिस्थिति मध्यवर्ती

सरकारला कळविली. १९ डिसेंबर रोजीं पंजाब सरकारनें मध्य-वर्ती सरकारकडे कायद्याचा एक विशिष्ट मसुदा पाठविला. पंजाब सरकारची अशी कल्पना होती कीं, जर मध्यवर्ती सरकार या मसुद्याला संमति देईल तर तो कायदा लागू करून क्रांतिकारक चळवळीचें दमन करणें सुलभ होईल. मध्यवर्ती सरकारला हेंही कळविण्यांत आलें कीं, शीखांच्या द्वारें सेनेमध्यें विद्रोहाचा भयानक प्रचार करण्यांत आलेला असून मागच्या महिन्यांत गाड्या रुळावरून उलटविण्याचे व डाकगाड्या लुटून फस्त करण्याचे प्रकार घडलेले आहेत. खटला न चालवितांच संशयित व्यक्तींना बेमुदत अटकेंत ठेवण्याचा अधिकार पंजाब सरकारला हवा होता. सरहद्द प्रांतांतील दंगेखोरांच्या बंदोबस्तासाठीं ज्या प्रकारच्या कायद्याची गरज आहे, त्या प्रकारचे कायदे पंजाबसाठीं उपयोगांत आणण्याचा पंजाब सरकारचा विचार होता. याप्रमाणें पंजाब सरकार व भारत सरकार यांच्यामध्यें पत्रव्यवहार सुरू होता; तर इकडे कर्तारसिंहाच्या आधिपत्याखालीं दरवड्याचें सत्र सुरूच होतें. दि. २४ व २५ डिसेंबर रोजीं जालंदर जिल्ह्यांतील फरला व करनाम या गांवीं दरवडे घातले गेले. याच तारखेस फिरोजपूर जिल्ह्यांतहि दोन ठिकाणीं दरवडे पडले. २७ डिसेंबर रोजीं गुरुदास जिल्ह्यांतील चौरीआन या गांवीं, १ जानेवारीला हुशियारपूर जिल्ह्यांत व ४ जानेवारी रोजीं जालंदर जिल्ह्यांत दरवडे पडले. यांपैकीं एका गांवीं एका चौकीदाराला ठार मारण्यांत आलें, व मांटगुमरी जिल्ह्यांत एका गांवीं आठ शीखांनीं एका मोहल्ल्यावर आक्रमण केलें असतां तेथील एक सब्ओव्हरसिअर बंदुकीची गोळी दंडाला लागून जखमी झाला. दि. १६ जानेवारी रोजीं गुरुदासपूर जिल्ह्यांतील श्रीगोविंदपूर या गांवीं एक दरवडा पडला. दि. २१ जाने-

वारी रोजीं कपूरथळा संस्थानांतील एका गांवीं कांहीं दुकानांची लूट करण्यांत आली. या लुटीनंतर कांहीं शिखांना अटक करण्यांत आली असतां त्यांच्याजवळ १ रिव्हॉल्व्हर व २४५ काडतुसें सांपडलीं. या दरवड्यांना राजनैतिक म्हणून सिद्ध करतां आलें नाहीं. पण जे दरवडे व जीं कृत्यें न्यायमंदिरांत राजनैतिक म्हणून सिद्ध करण्यांत आलीं तीं येणेंप्रमाणें:—

दि. २३ जानेवारी रोजीं लुधियाना जिल्ह्यांतील एका दुकानदाराला त्याच्या परिवारासहित चोप देण्यांत येऊन त्याच्या पत्नीच्या अंगावरील दागिने जबरदस्तीनें काढून घेण्यांत आले. दुकानदाराला दिलेल्या मारामुळें पुढें तो मेला. पण या ठिकाणीं संपत्ति अतिशय थोडी मिळाली. दि. २७ जानेवारी रोजीं १५ क्रांतिकारकांनीं, याच जिल्ह्यांतील मनसूरन् नांवाच्या गांवीं एका धनाढ्य गृहस्थाच्या घरावर हल्ला चढवून पुष्कळशी संपत्ति हस्तगत केली. या हल्ल्यांत एका मुलाला व स्त्रीला बराच मार बसला. या दरवड्यांत लुधियानाचे कांहीं विद्यार्थीहि समाविष्ट होते. गांवांतले लोक लाठीबंद होऊन क्रांतिकारकांवर चालून आले असतां त्यांच्या पुढाऱ्यानें समोर होऊन सांगितलें कीं, "या लुटींतील पै न् पै इंग्रजांना या देशांतून हाकून लावण्याच्या कामीं उपयोगी पडावयाची असल्याकारणानें आपणांपैकीं कोणीहि या कृत्याच्या आड येऊन अकारण स्वत:च्याच देशबांधवांच्या रक्तानें हात माखण्याचा प्रसंग आमच्यावर आणूं नये." पण गांवकरी या तोंडी धमकावणीला बधत नाहींत असें आढळून आल्यावर मात्र क्रांतिकारकांनीं रिव्हाल्व्हर्स व बॉम्बसचा मोकळ्या हातानें उपयोग करून त्यांना परास्त केलें. दि. २९ जानेवारी रोजीं मालेरकोटला संस्थानांतील झानीर नांवाच्या गांवीं एका सावकाराच्या घरीं

दरवडा घालण्यांत येऊन आणखीहि कित्येक धनिकांचीं घरें दाखवून देण्याविषयीं त्याला विवश करण्यांत आलें. फेब्रुवारी १९१५ मध्यें अमृतसरजवळ असलेल्या चब्बा नांवाच्या गांवीं एका ब्राह्मण सावकाराच्या घरावर हल्ला चढवून त्याला ठार मारण्यांत आलें. गांवकरी चालून आले असतां बाँब व पिस्तुलांचा मुक्तहस्तानें उपयोग करून त्यांना परास्त करण्यांत आलें. या हातघाईत एका लोहाराला पकडण्यांत आलें असतां त्यानें स्वतःच्या नेत्याचें नांव "मूलासिंह" असें सांगितलें. लवकरच क्रांतिकारकांना असें आढळून आलें कीं, हा मूलासिंह बदमाष मनुष्य असून त्यानें पैशाच्या बाबतींत पुष्कळच: अफरातफर केलेली आहे. पोलिसांनीं लवकरच या मूलासिंहाला पकडलें व तो माफीचा साक्षीदार बनून, शचीन्द्रांनीं पहिल्या नजरफेकींत त्याच्यासंबंधीं मागें सांगितलेलें अनुमान केलें होतें, तें खरें असल्याचें कर्तारासिंह प्रभृतींच्या त्यानें प्रत्ययास आणून दिलें !

या ठिकाणीं कर्तारसिंहांच्या श्रेष्ठ चारित्र्यशीलतेची एक गोष्ट मी सांगण्याचा मोह आवरूं शकत नाहीं. दि. ३ फे. १९१५ ची ही गोष्ट आहे. या दिवशीं लुधियाना जिल्ह्यांतील रब्बो नांवाच्या गांवीं दरवडा घालण्यांत आला. टोळीचे नायक बागी कर्तारसिंह हे होते. ज्या घरावर दरवडा घालण्यांत आला तेथें एक अतिशय सुंदर व वयांत आलेली मुलगी उभी होती. तिला पहातांच या टोळींतल्या एका चंचल मनोवृत्तीच्या तरुणाचें चित्त विचलित होऊन त्यानें कामार्ततेनें तिचा हात पकडला. मुलीनें एक आर्त किंकाळी फोडली. ती ऐकताच कर्तारांचें लक्ष त्या प्रकाराकडे वेधलें. त्यांनीं दुसरें तिसरें कांहीं एक न करतां भरलेलें रिव्हाल्व्हर त्या पापात्म्याच्या मस्तकाशीं जुडवीत त्याला 'ही मुलगी माझी

बहीण आहे.' असें वदवायला लावून चरणस्पर्श करून तिची माफी मागावयास भाग पाडलें. हा अद्भुत प्रकार पहातांच ती मुलगी व तिची वृद्ध माता या दोघींचेहि डोळे कृतज्ञतेनें भरून आले. सद्गदित होऊन ती माता कर्तारांना म्हणाली, "बाळ, असा धर्मात्मा अन् शीलसंपन्न असतांना तूं या भीषण कार्याला कसा प्रवृत्त झालास बाबा?" कर्तार उत्तरले, "आई, या भरत-भूमीच्या कुशींत जन्म घेणारा प्रत्येक तरुण असाच **शीलचारित्र्य**-संपन्न होता. पण ज्या चांडाळांनीं आमच्या श्रेष्ठतम भूमातेचें स्वातंत्र्यधन लुटून नेलें त्यांनीं या देशांत अशी परिस्थिति निर्माण केली आहे कीं, आमच्यांतलें शील संपलें, आमच्यांतल्या चारित्र्याचें दिवाळें वाजलें, माणुसकी विलायास गेली, व आम्ही आज पशूहून पशु बनलों आहोंत. ही परिस्थिति आमूलाग्र बदलवून आमचें पूर्वीचें स्थान परत मिळवायला भूमातेचें विगत स्वातंत्र्य परत मिळाविणें अन् इंग्रजी राज्य उलथून पाडणें हा एकच काय तो मार्ग आहे. म्हणून इच्छा नसतांना देखील मला या भीषण कार्याला प्रवृत्त व्हावें लागलें. तूंच सांग! दुसरा कांहीं मार्ग आहे का?" तिचें सारें घर धुवून काढण्यांत येत असतां कर्तारांना ती म्हणाली, "बेटा, या आपल्या धाकट्या बहिणीच्या लग्नासाठीं तूं कांहींच का देणार नाहींस?" कर्तारांनीं सारा लुटीचा ढीग तिच्या समोर ओतला. डोळ्यांत पाणी आणून तो परत त्यांच्या स्वाधीन करीत ती म्हणाली, "बेटा, ईश्वरानें प्रेरणा दिल्यावांचून का तुझ्यासारखे धर्मात्मे अशा कार्यांत भाग घेत असतात? जा, बाबा जा, ईश्वर तुझें रक्षण करून तुझें उद्दिष्ट सफळ करो!"

असो. याशिवाय दि. ३, ६, ७, १५, १८, २१, जानेवारी रोजीं रेलगाडी रुळावरून पाडण्याचेहि प्रयत्न झाले. प्रविख्यात

कोमागाटामारू प्रकरणाचे कांहीं अभियुक्त याच सुमारास सुटले होते. कर्तारांनीं त्यांना परत आपल्या कार्यांत समाविष्ट करून घेतलें. या सुमारास डॉ. मथुरासिंहानीं स्वतंत्रपणें बाँब गोळे तयार करण्याचा प्रयत्न केला. पण तें त्यांना कधींच जमलें नाहीं.

## १२ यतीन्द्रनाथ रासबिहारींना भेटतात

शचीन्द्रनाथ संन्याल पंजाबची पाहाणी करून परत आल्यानंतर प्रख्यात यतीन्द्रनाथ मुखोपाध्याय हे बनारस येथें रासबिहारींची भेट घेण्यास्तव आले. यतीन्द्रनाथ मुखोपाध्यायांना जतीन मुकर्जी या नांवानें सारे ओळखत. भारतीय आंतकवादाच्या चार आधारस्तंभांपैकीं हे एक होत, हें मीं प्रथमच सांगितलें असल्यामुळें त्यांच्या योग्यतेसंबंधीं अधिक सांगण्याची गरज नाहीं. त्यांच्या विशुद्ध चारित्र्यामुळें व श्रेष्ठ आत्मिक बळामुळें क्रांतिकारकांच्या मध्यें त्यांचें अतिशय वजन असे. यतींद्रांना रासबिहारींनींच मुद्दाम बोलाविलें होतें. त्यांना बोलावण्याचा उद्देश असा होता कीं, समस्त उत्तर भारत एकाच सूत्रांत गोवलें जाऊन पंजाबच्या सीमान्त प्रदेशापासून तर पूर्व आसामच्या सीमान्त प्रदेशापर्यंत सर्व ठिकाणीं एकाच सुसूत्र संघटनेकडून एकाच दिवशीं नि एकाच क्षणीं सशस्त्र उठावणी करण्याची योजना नक्की करावी. पंजाबचे शीख या वेळीं उठावणीचा दिवसाची अतिशय घाई करीत होते. रासबिहारींनीं स्वतःला वाटत असलेला उठावणीचा क्षण व दिवस याची कल्पना देतांच यतींद्र मुकर्जी परिस्थितीचें एकंदर आलोचन करून त्यांना म्हणाले कीं, "रासूदा, उठावणीचा दिवस नि क्षण तुम्ही म्हणतां त्यापेक्षांही दोन महिने पुढें ढकलावा असें माझें मत आहे. क्रांति जर पूर्णपणानें यशस्वी करायची असली तर जुसते उत्साह, संघटना अन् देशभक्तीची उदात्त भावना यांनीं

काम भागणार नसून व्यावहारिक दृष्टीचा अंगिकार केला पाहिजे. पुरेशी शस्त्रसंपत्ति अन् धनसंचय यावांचून आपलें नडल्याखेरीज रहणार नाहीं. त्या दृष्टीनें आणखी दोन महिन्यांचा अवधि लांबविणेंच मला श्रेयस्कर वाटतें." पण रासबिहारींनीं त्यांना सांगितलें कीं, "अधिक विलंबानें पंजाबांतले भावनाप्रधान शीख सारेंच काम नासवून टाकण्याचा संभव आहे. म्हणून तुम्ही शक्य तितका लवकर बंगालमध्यें धनसंचय अन् शस्त्रसंचय करा. मी स्वत: पंजाबमध्यें जाऊन परिस्थितीचें एकदां नीट निरीक्षण करतों अन् तुम्हाला उठावणीचा दिनांक कळवितों. मात्र तारीख फारशी लांब असणार नाहीं." रासबिहारींचा निरोप घेऊन जतीन मुकर्जी बंगालमध्यें गेले.

त्यांनीं बंगाल्यांत पाऊल घातलें मात्र तोंच बंगालमध्यें सुविख्यात मोटार-दरवडयांना प्रारंभ होऊन शस्त्रास्त्रें व धन यांच्या राशी त्यांच्या पायाशीं येऊं लागल्या. रोडा कंपनीच्याच एकट्या दुकानावर हल्ला करून वंगीय क्रांतिकारकांनीं या वेळीं ५० मौजेर पिस्तुलें व पन्नास हजार काडतुसें हस्तगत केलीं होतीं. असो. भाई परमानंद यांनीं या सुमारास रासबिहारींना एक पत्र लिहून त्यांत अशी विनंती केली होती कीं, "आपण आपलें बहुमोल जीवन अज्ञातवासांत संपविण्यापेक्षां कांहींतरी भरीव देशकार्यांत खर्च करावें." प्रत्यक्ष गदरच्या पंजाबांतील तयारीच्या भक्कमपणाविषयीं भाईजींना जबरदस्त शंका असल्यामुळें ते या आंदोलनांत प्रत्यक्ष भाग घेत नव्हते. तरी पण त्यांच्या संमतीची अथवा भावी परिणामांची मुळींच पर्वा न बाळगतां बागी कर्तारसिंह मोकळेपणानें अवश्य तेथें त्यांच्या नांवाचा उपयोग करीत असल्यामुळें पंजाब सरकार व पंजाबांतले उतावळे शीख भाईजींनाच या गदर

प्रकरणाचे पंजाबांतील मुख्य सूत्रधार समजत असत. रासबिहारींनीं भाईजींचें तें पत्र पाहिलें व एकवार शचींन्द्रांकडे पाहून एक भावगर्भ स्मित केलें. भारतीय विप्लवाच्या त्या महान् अधिनायकाच्या त्या भावगर्भ स्मितांत कोणतें ब्रह्मांड सांठविलेलें नव्हतें ?

## १३ रासबिहारींचा पंचनदांतील पदन्यास

ज्या वेळीं जतीन मुकर्जी बंगाल्यांत जावयास निघाले त्याच वेळीं रासबिहारीही पंजाबमध्यें जावयास निघाले. या दिवसांत रासबिहारींच्या बरोबर त्यांच्या संरक्षणासाठीं म्हणून कुणी ना कुणी क्रांतिकारक असेच. कारण त्यांना पकडून देणाऱ्यास सरकारतर्फें साडेसात हजारांचें बक्षिस जाहीर झालेलें असून गुप्तचरांचे नेत्र त्यांच्यावर घारीसारखे टपले होते. रात्रीच्या गाडीनें ते दिल्लीच्या मार्गानें पंजाबांत जावयास निघाले. त्यांनीं समोर पाहिलें तों त्यांच्यावरचें संकट जणूं कांहीं आ वासून त्यांचा ग्रास करावयास उभें असलेलें त्यांना आढळून आलें. ज्या छोट्याशा डब्यांत ते बसले होते त्याच डब्यांत त्यांच्या चांगल्या परिचयाचा एक सी. आय्. डी. इन्स्पेक्टर मजेनें धूम्रपान करीत बसला होता. पण त्यानें रासबिहारींना शुद्ध बंगाली वेषांत व अनावृत मस्तकानें पाहिलें होतें. या वेळीं त्यांच्या डोक्यावर टोपी व पोषाखाची तऱ्हा अपरिचित असल्यामुळें तो त्यांना ओळखूं शकला नाहीं. रासबिहारींनीं आपल्या डोक्यावरची टोपी अधिकच कपाळावर ओढून घेतली व ते स्वच्छ झोपेनें घेरल्यासारखे गुडघ्यांत मान घालून बसले. स्टेशन येतांच त्यांनीं आपला डबा बदलून घेतला व ठरल्या वेळीं ते अधिक कांहीं अडचण उपस्थित न होतां अमृतसर येथें येऊन पोहोचले.

पंजाबमध्यें येतांना उत्तरभारतांतील संघटनेचीं सूत्रें शचींन्द्रांचे

हातांत सोपवून रासबिहारी निघाले होते व वेळोवेळीं कार्याचीं प्रतिवृत्तें कळविण्याबद्दल त्यांनीं शचीन्द्रांना बजाविलें होतें. शचीन्द्रांनीं आपल्या सहकाऱ्यांसह बंगाल, बिहार व युक्तप्रांत येथील छावण्यांमधून बारकाईनें शोध केल्यानंतर त्यांना असें आढळून आलें कीं, देशांत गोरी सेना फार थोडी असून जे आहेत तेहि नवशिके, पोरसवदा व अननुभवी लोकच आहेत. या लोकांनीं प्रत्येक छावणींतील अस्त्रशस्त्रांचे, गोऱ्या व काळ्या सैनिकांचे व एकंदर साधनसामुग्रीचेहि आकडे मोठ्या शिकस्तीनें मिळवून एक अतिशय उपयुक्त असें कोष्टकच तयार केलें होतें. लष्करी छावण्यांतील लोक क्रांतिकारकांचा आपल्या छावण्यामधून गोऱ्या अधिकाऱ्यांच्या लक्षांत न येईल अशा पद्धतीनें मोठा आदरसत्कार करीत असत, इतका त्यांच्यांत क्रांतिकारकांनीं विप्लवाच्या विचारसरणीचा प्रसार केलेला होता. आतां शचीन्द्र व त्यांचे साथीदार रोज या छावण्यामधून जाणें येणें करूं लागले. सेनेप्रमाणेंच खेड्यापाड्यांतूनहि यांचा प्रसार सुरूच असे. विशेषतः युक्त प्रांतांतल्या ठाकूर लोकांपैकीं पुष्कळ लोक या वेळीं शचीन्द्रांना अनुकूल झाले. शचीन्द्रांनीं रासबिहारींच्या सूचनेनुरूप या लष्करांतील लोकांना अशी स्पष्ट सूचना दिली होती कीं, त्यांनीं कसलाहि बभ्रा न करतां अगर आपसांतहि कांहीं एक न बोलतां साऱ्या उत्तरभारतांतील छावण्यांतील भारतीय सैनिकांनीं, ज्यांना जो दिवस कळविण्यांत येईल, त्या दिवशीं एकदम, अचानकपणें, एकाच क्षणीं, गोऱ्या अधिकाऱ्यांवर व गोऱ्या सैनिकांवर हल्ला चढवावा. दंगा रात्रीच्या वेळीं प्रारंभ करावा. त्याच वेळीं तार वगैरे संदेशवाहक साधनें तोडून व नष्ट करून एकजात सगळ्या गोऱ्या लोकांना पकडून वा मारून नंतर खजिना लुटावा. त्यानंतर तुरुंग फोडून कैद्यांना बंधमुक्त करावें.

नंतर त्या स्वतंत्र केलेल्या जागेच्या व आसपासच्या टापूच्या संरक्षणासाठीं कुण्यातरी योग्य पुरुषाची नियुक्ति करून इतर सर्व क्रांतिकारकांनीं तडक पंजाबच्या रोखानें चालूं लागावें. पंजाब ही रासबिहारींनीं क्रांतिकारकांची केन्द्रभूमि व स्वातंत्र्याच्या निर्णायक सामन्याची मुख्य युद्धभूमि ठरविली होती. सर्व विद्रोह्यांनीं पंजाब-मध्यें एकत्रित होऊन कमींत कमी एक वर्षपर्यंत तरी पंजाब व्यव-स्थितपणें लढवला पाहिजे असें त्यांचें मत होतें. १८५७ सालच्या प्रख्यात स्वातंत्र्य-संग्रामांतील संकेतासारखेंच या संग्रामांतील संकेतांचेंहि स्वरूप होतें. त्या संग्रामांत ज्याप्रमाणें प्रत्येक छावणींतील भारतीय सैनिकांनीं आपापल्या छावणींतील गोऱ्या अधिकाऱ्यांना मारून, खजिना लूटून, भोंवतालचा टापू स्वतंत्र करून, कैदी मोकळे करून व प्रांताचा बंदोबस्त करून दिल्लीला येऊन तेथील केन्द्रस्थानीं एकत्रित मिळावें, असा संकेत होता तसाच तो या वेळींहि होता. फक्त त्या वेळच्या अन् या वेळच्या समरकेन्द्रांच्या स्थानांत फरक होता.

कांहीं दिवसानंतर रासबिहारींनीं पंचनदांतील विप्लववाद्यांचे अधि-नायक बागी कर्तारसिंह यांना त्यांच्या कांहीं सहकाऱ्यांसह शची-न्द्रांच्या सहवासांत क्रांतीचें एकंदर स्वरूप लक्षांत भरण्यासाठीं मुद्दाम बनारसला जावयास सांगितलें. त्याप्रमाणें कर्तार आपल्या कांहीं साथिदारांसह बनारसला येऊन व कांहीं दिवस तेथें राहून पुनश्च पंजाबमध्यें परत गेले. पंजाबांतील लष्करी छावण्यांत शिरून लष्कर फितविण्याचें काम अन् तेंहि पंजाबी लोकांच्या घायकुत्या, भडभड्या व म्हणून क्रांतीच्या उठावणीच्या बाबतींत अवश्य त्या गुप्ततेच्या धोरणाला सर्वस्वीं विराधक अशा स्वभावाला गृहीत धरून करावयाचें. हें अत्यंत कठीण कार्य रासबिहारींनीं स्वतः-

च्याच शिरावर घेतलें; व अवघ्या एकदोन आठवड्यांच्या आंतच तें अत्यंत कुशलतेनें पार पाडलें. पकडवॉरंटांची तरवार अन् वध-स्तंभावरची तात डोक्यावर सतत टांगती असल्यामुळें त्यांना अतिशयच सावधगिरीनें वागावें लागे. शचीन्द्रांच्यासारखें त्यांना उघड-पणें वावरतां येणें तर केवळ अशक्य कोटींतलें होतेंच! पण पृथ्वी-सिंह अथवा कर्तारसिंह यांच्याप्रमाणें त्यांना सहजासहजीं पोलि-सांच्या हातावर तुरी देऊन निसटून जातां येणेंहि कठीण होतें. या साऱ्या कारस्थानांना कुणाच्या कर्तृत्वशक्तींतून जीवनरसाचा अव्याहत पुरवठा होतो आहे व कुणाच्या प्रतिभेंतून क्रांतीचें हें रक्तरंजित चित्र रेखाटलें जात आहे याची ब्रिटिश सरकारला पूर्णपणें जाणीव होती. रासबिहारींना जिवंतच नव्हे तर मेलेलेही आणून कुणी दाखविलें असतें, तर साडेसात हजार रुपयांचें बक्षिस देऊन वर एकाद्या पदवीच्या शाबासकीचा मनपसंत आहेर द्यावयास न चुकण्याइतकें सरकार या बाबतींत आतुर झालें होतें. हिंदु-स्थानच्या भूमींतून आपल्या उद्धारकालाच सुळावर चढविणाऱ्या मातागमनी बेइमानांचें पीक कांहीं कमी पिकत नाहीं, हेंहि रास-बिहारींना नव्यानें कुणी सांगण्याची गरज नव्हती. त्यामुळें अवश्य तितक्या सावधगिरीनें राहाणें त्यांना भागच होतें. त्यांनीं आपल्या मूळ वसतिस्थानाखेरीज त्या वसतिस्थानापासून अगदीं विरुद्ध दिशेला लांब अंतरावर दोनतीन घरें घेतलीं होतीं. या घरांमध्यें भेटीगांठी घेणें व सर्व प्रकारचे लोकांशीं संबंध येणारे व्यवहार करणें इत्यादि गोष्टी रासबिहारी करीत. त्यामुळें त्यांच्या खऱ्या निवासस्थानाचा पत्ता अखेरपर्यंत कुणालाच लागूं शकला नाहीं. हवालदार लक्ष्मणसिंह, व एक मुसलमान हवालदार या दोघांचें, सैन्यामध्यें विप्लववादाचें लोण पोहोंचविण्याच्या बाबतींत त्यांना

अतिशय महत्वाचें सहाय्य झालें. पुढें या दोन्ही हवालदारांना बरोबरच फांशीं देण्यांत आलें. १९१५ साळच्या जानेवारी महि-न्याच्या शेवटीं जे रासबिहारी पंजाबमध्यें आले ते फेब्रुवारी महिन्याच्या शेवटापर्यंत तेथेंच होते. त्यांनीं कर्तारांना हाताशीं धरून एक विशाल संघटन निर्माण केलें. शेवटीं सर्वांच्या विचारें त्यांनीं २१ फेब्रुवारी १९१५ ही उठावणीची तारीख निश्चित केली. सर्व ठिकाणीं एकाच दिवशीं एकाच क्षणीं उठावणी होणें अवश्य असल्यामुळें बनारसला असलेल्या शचीन्द्रनाथ संन्यालांना व त्यांच्या द्वारें युक्त प्रांत, बिहार, आसाम व बंगाल येथील विप्लवाच्या नेत्यांना हा दिनांक कळविण्यांत आला. ठिकठिकाणीं शस्त्रसंचय व धनसंचय व्यापक प्रमाणावर करण्यांत आला. विप्लववाद्यांचा गणवेष व ध्वज ठरविण्यांत आला. हा ध्वज चतुरंगी असून हे चारहि रंग हिंदुस्थानांतील हिंदू, शीख, मुसलमान व तदितर सर्व जनतेच्या एकमुखी एकसंधीपणाचें प्रातिनिधिक मानण्यांत आले होते. पुष्कळसें धान्य एकत्रित करण्यांत आलें होतें. ठिकठिकाणचीं वाहतुकीचीं साधनें व त्यांच्या द्वारें प्रवास करणारे प्रवासी यांची अवश्य ती नोंद व्यवस्थितपणें ठेवण्यांत येऊं लागली. रेल्वे लाइन्स व संदेशवाहक तारा तोडून टाकण्याचीं सारीं अवजारें ठिकठिकाणीं एकत्रित करण्यांत आलीं. रासबिहा-रींनीं युद्धघोषणापत्र व स्वातंत्र्ययुद्धाचा जाहीरनामाही तयार केला. इतकी सर्व तयारी झाल्यानंतर साऱ्या उत्तर भारतांतले क्रांति-कारक आगामी फेब्रुवारी २१ या रासबिहारींनीं कळविलेल्या तारखेकडे अतिशय उत्सुकतेनें पाहूं लागले. पंजाबमध्यें ठिणगीचें लाल तोंड दिसूं लागतांच साऱ्या उत्तर भारताचा ज्वालामुखी विप्लवाचा तप्तरस ओतणार होता... पण !

## १४ ' बुद्धिनाशात्प्रणश्यति !

पण पंजाबी क्रांतिकारकांच्या कृतघ्न फितुऱ्यावर दया दाखविण्याच्या मूर्खपणाच्या रणनीतीमुळें व भोंगळया नि बावळटपणाच्या सैल कारभारामुळें रासबिहारींची ही इतकी प्रचंड, सिद्ध व सन्नध्द योजना पार धुळीला मिळाली. शत्रू—राष्ट्राचें कूंसही वाकडें न होतां क्रांतिकारक मात्र मृत्यूच्या पाशांत अडकले. रणांत ते अयशस्वी ठरले असते तर गोष्ट वेगळी होती. धारातीर्थीं ते पतन पावले असते तर ती गोष्ट अभिमानाची होती. साऱ्या जगाचा तो कौतुकाचा विषय झाला असता. स्वातंत्र्याच्या वैतालिकांच्या हातीं तें एक महाकाव्य लाभलें असतें; पण तसें कांहीं एक न घडतां बंडखोर, गुन्हेगार म्हणून स्वातंत्र्यदेवतेच्या या महान् उपासकांना काळी टोपी डोक्यावर चढवून फासावर चढावें लागलें. त्यांना मरण देखील शस्त्रपूत लाभलें नाहीं; तर तें लळत लोंबकळतच लाभलें. अमृतसरजवळील चब्बा नांवाच्या गांवीं मूलासिंहाच्या नेतृत्वाखालीं दि. २ फेब्रुवारी रोजीं एक दरवडा घालण्यांत आला होता, ही गोष्ट मागें सांगितलीच आहे. या घटनेच्या मुळाशीं असलेल्या कारस्थानाच्या स्वरूपाचा छडा लावावा म्हणून पंजाबी गुप्तचरांच्या एका मुसलमान मुख्याधिकाऱ्यानें मूलासिंहाला एकदम अटक न करतां त्याच्या एकंदर हालचालीवर नजर ठेवावी म्हणून कृपालसिंग नांवाच्या एका गुप्तचराची योजना केली. या कृपालसिंहाचा एक दूरचा नातलग इंग्रजी सैन्याविभागांत नोकरीवर असून क्रांतिकारकांच्या संघटनेचा सभासद होता. त्याच्या द्वारें फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्याच्या शेवटीं या कृपालसिंगाचा क्रांतिकारकांच्या गुप्त संघटनेंत प्रवेश झाला. रासबिहारींना या माणसाचा तावडतोब संशय आला. त्यांनीं त्याच्यावर पाळतीसाठीं

माणसें ठेवलीं; तों त्यांना असें आढळून आलें कीं, कृपालसिंग रोज एका नियत वेळीं नियत अशा संशयास्पद ठिकाणीं जात असतो. ज्या वेळीं कृपालसिंगाच्या बाबतींतलें आपलें मत रासबिहारींनीं निश्चित बनविलें होतें त्या वेळीं फेब्रुवारीच्या त्या नियत एकवीस तारखेला पूर्णपणें एक आठवडाहि उरलेला नव्हता. रासबिहारींनीं पंजाबी क्रांतिकारकांना या गोष्टीची कल्पना दिली. त्यांची अपेक्षा अशी होती कीं, पंजाबी क्रांतिकारक या फितुऱ्या इसमाला ताबड-तोब गोळी घालून ठार मारतील व अशा निमकहरामांची ठरलेली जागा जे रौरव-कुंभीपाकासारखे नरक त्यांतल्या एकाद्या ठिकाणीं त्याला कायमचा पाठवून देतील. पंजाबच्या ऐवजीं बंगाल असता तर या इसमाची योग्य ती वासलात प्रत्यक्ष नेत्याकडून सूचना मिळायच्या आंतच लागली असती व पुढचा दारुण प्रसंग टळला असता. पण आतेला मिशा असत्या तर काका म्हणून म्हटलें नसतें कोणी ? असो. पंजाबी क्रांतिकारक या कृपालसिंगाला कायमचा संपवून टाकण्याऐवजीं, त्याला मारण्यानें अधिक नुकसान होईल, का न मारण्यानें होईल, याच्यावर आपसांत वादविवाद करीत बसले अन् त्याचा व्हायचा तोच परिणाम होऊन, २१ फेब्रु-वारी हा दिनांक ठरला असल्याचें सरकारला कळलें. सरकार एकवीस फेब्रुवारीच्या बाबतींत सचेत झालें असल्याची बातमी ज्या वेळीं कर्तारसिंह प्रभृतींना कळली, त्या वेळीं तरी त्यांनीं कृपालसिंगाला प्रथम यमलोकचा रस्ता दाखवून नंतर इतर बेत ठरविण्याच्या भानगडींत पडायचें असतें. पण मरणघडी जवळ आली म्हणजे बुद्धिचक्राचीही गति उलट दिशेनें चालूं लागते असें म्हणतात. कृपालसिंगाला ठार मारण्याऐवजीं त्यांनीं त्याला नजर-कैदेंत ठेवून त्याच्यावर कांहीं माणसें पहाऱ्यावर ठेवून दि. २१

फेब्रुवारीच्या ऐवजीं दि. १९ फेब्रुवारी ही उठावणीची तारीख म्हणून ठरविली. लष्करांत ही सूचना देण्यासाठीं म्हणून ज्या गृहस्थाला पाठविलें होतें त्यानें या तारखेच्या आदल्याच दिवशीं म्हणजे दि. १८ फेब्रुवारी रोजीं सकाळीं, कृपालसिंग बसला असतांनाच येऊन, मोठ्यानें रासबिहारींना सांगितलें कीं, "२१च्या ऐवजीं १९ दिनांक ठरली असल्याचें मी लष्करांत कळवून आलों आहें." रासबिहारींनीं हें ऐकतांच कपाळावर हात मारून घेतला. कृपालसिंगाला सांभाळण्याबद्दल शेवटचा इषारा देऊन ते तेथून बाहेर पडले. ते आतां पूर्णपणें पंजाबी क्रांतीचें अन् एकंदर भारताच्या क्रांतीचें काळें कभिन्न भविष्य समजून चुकले होते. रासबिहारींची पाठ फिरतांच त्यांच्या इषाऱ्याचें मर्म ध्यानांत नीटपणानें न घेतां त्या ठिकाणीं असलेली सारी मंडळी जेवायला म्हणून घरोघर निघून गेली. त्या घरांत आतां कुणीच नाहीं असें पाहून हळूंच पाहाऱ्यावर ठेवलेला चौकीदारही जेवायला निसटला. कृपालसिंगाला तरी हेंच हवें होतें.त्यानें हळूच बाहेर पडून,रस्त्यावर येऊन, एका सायकलीवरून जाणाऱ्या गुप्तचराला अडविलें, अन् १९ तारखेचा नवा बदल सरकारी गोटांत कळविला. तो पुनश्च कुणाच्या लक्षांत येण्यापूर्वींच परत स्वस्थानीं येऊन बसला !

अवघ्या कांहीं तासानंतरच पोलिसांनीं हत्यारबंद होऊन त्या घराला वेढा दिला. पोलिसांना कृपालसिंगाच्या सूचनेनुरूप अशी आशा होती कीं, या अचानक टाकलेल्या जाळ्यांत रासबिहारी निश्चित अडकतील. पण ते सरकारच्या बारशाला जेवलेले होते ! त्यांच्या राहण्याचा पत्ता कुणालाच माहित नसल्यामुळें ते सरकारच्या हातीं लागूं शकले नाहींत. या घरांत अमरसिंग इत्यादि सात क्रांतिकारकांना अटक झाली. झडतींत एक रिव्हाल्व्हर,चार ध्वज,

कित्येक तयार असलेले बॉम्ब व बॉंब गोळे बनविण्याची सामग्री सरकारच्या हातीं लागली. सरकार आतां पूर्णपणें सावध झालेलें होतें. त्यामुळें त्यांनीं मॅगनीज व शस्त्रागार यांच्यावर जो काळ्या शिपायांचा पहारा होता तो अजिबात बदलून त्या जागीं गोऱ्या शिपायांचा पहारा ठेवला. शहरांतील गोऱ्या लोकांना एकत्रित करून त्यांना सन्नद्ध राहाण्याची सूचना देण्यांत आली. हत्यारबंद गोऱ्या शिपायांच्या टोळ्या मशीनगन्स बरोबर घेऊन व रायफली खांद्यावर टाकून रस्त्यारस्त्यांतून व बोळाबोळांतून नागरिकांच्या मनांत दहशत उत्पन्न करीत फिरूं लागल्या. लाहोर, दिल्ली, फिरोजपूर इत्यादि सर्वच ठिकाणीं हा देखावा अचानकपणें उत्पन्न झालेला पाहून देशी शिपाई घाबरून गेले व त्यांच्या उठावणीचे बेत मनांतल्या मनांतच जिरले. ठरल्याप्रमाणें फौज उठली नाहीं म्हणून खेड्यापाड्यांतले छोटे मोठे ठाकूर, जमीनदार व त्यांच्या मागें असलेली ग्रामीण जनता प्रथम गोंधळून गेली. नंतर सारें कारस्थान फसल्याचें ध्यानांत येतांच ज्यांनीं त्यांना उठावणीची सूचना दिली होती त्यांना दोष देत ते आपआपल्या जागीं स्वस्थ बसले. बागी कर्तारसिंग मात्र त्या तशा परिस्थितींतही शेवटचा प्रयत्न म्हणून स्वत: बरोबर ८० निवडक माणसें घेऊन फिरोजपूरच्या छावणींत गेले व छावणीजवळ फिरणाऱ्यांची कसून तपासणी होत असतांनाहि युक्तीनें आंत प्रवेश करून, काळ्या पलटणीच्या हवालदाराला जाऊन भेटले. पण त्यानें लाचारीच्या स्वरांत कर्तारांना सांगितलें कीं, " आपला सारा कट उघडकीस आला असून सरकारनें सर्व प्रकारचा बंदोबस्त केलेला आहे. आमच्या हातांत एक देखील हत्यार नाहीं व कुणाच्या कानांत दोन शब्द कुजबुजण्याची देखील सोय नाहीं. अशा स्थितींत थोडीशीही हालचाल

केल्यानें फळ तर कांहींच हातीं गवसण्याचा संभव नसून हजारों माणसांना फुकट मरावें मात्र लागेल. त्यामुळें मी या वेळीं कांहींही करावयास पूर्णपणें असमर्थ आहें. तुमचा उत्साह, तुमचें शौर्य, तुमची तडफ, नेतृत्व अन् ज्वलंत देशभक्ति, सारें, सारें कांहीं मला मान्य आहे; पण क्षमा करा. इथें अधिक वेळ थांबून तुम्हीही आपला जीव अकारण धोक्यांत घालण्याचें वेडें साहस करावें असें मला वाटत नाहीं." कर्तार यावर काय बोलणार होते ? त्यांचें म्हणणें खरेंच होतें. लाचारीनें व दुःखानें जागच्या जागीं हात चोळीत अन् दांत ओठ खात कर्तारासिंह आपल्या मंडळीसह तसेच परत फिरले.

वर्तमान भारताच्या स्वातंत्र्य-प्रयत्नांच्या इतिहासांत १९ फेब्रुवारी १९१५ या दिवसाचें अतिशय महत्व आहे. १८५७ सालचें स्वातंत्र्ययुद्ध व १८७३ सालची पंडित रामसिंह कुका यांची पंजाबांतील क्रांतिकारक उठावणी या दोन प्रसंगीं जी सशस्त्र युद्धाची तयारी करण्यांत आलेली होती, तेवढ्याच व्यापक प्रमाणावर याही वेळीं प्रथमच वर्तमान भारताच्या इतिहासांत सन्नद्धता व सिद्धता करण्यांत आली होती. पण सत्तावन सालची सिद्धता कामीं आली. कुका विग्रहांत भलत्याच वेळीं उठावणीची घाई करण्यांत आल्यामुळें जरी अपयश आलें असलें तरी सिद्धता अगदींच व्यर्थ जाऊं शकली नाहीं. या वेळीं मात्र पंजाबी क्रांतिकारकांच्या जबाबदारी ओळखून काम न करण्याच्या वृत्तीमुळें व कुपात्रीं प्राणदानासारखें महत्वपूर्ण दान देण्याच्या आंधळ्या औदार्यामुळें येवढी सारी सिद्धता व तयारी निव्वळ व्यर्थ गेली ! धृतराष्ट्रानें एका दुर्योधनाची गय केली; त्याला सर्वनाशाचें दारुण दुःख सहन करून जन्मभर अश्रु-मोचन करीत बसावें

लागलें. शिंदे-होळकरांनीं एका नजीबखानाला वांचविलें अन् पानपतच्या युद्धांत हिंदुराष्ट्राच्या पाठीचा कणाच मोडून पडला! पृथ्वीराजानें एका महंमद घोरीवर दया दाखविली अन् सारें राष्ट्र पारतंत्र्याच्या घाणेरड्या खातेऱ्यांत खितपत पडलें. पंजाबी क्रांतिकारकांनीं रासबिहारींच्या इषाऱ्याकडे दुर्लक्ष करून एका कृपालसिंगाला जिवंत सोडलें अन् त्याचा परिणाम क्रांतिकारकांनीं उभारलेली सारी विप्लवाची इमारत धुळींत मिसळण्यांत झाला!! असो.

निराश झालेल्या अंतःकरणानें बागी कर्तारसिंह लाहोरला रासबिहारींच्या घरीं आले. त्यांनीं पाहिलें तों त्यांना काय आढळलें? भारतीय क्रांतिवादाचा तो महान् हिरण्यगर्भ, भारतमातेच्या कंठांतला तो दैदीप्यमान् कौस्तुभमणि रासबिहारी बोस डोक्यावरून चादर घेऊन एखाद्या संज्ञाहीन प्रेताप्रमाणें निश्चल व बधिर होऊन डोळे मिटून पडला होता. त्यांच्याकडे पाहून खिन्नमनस्क व भग्नमनोरथ कर्तारांनींही दुसऱ्या एका खाटेवर असहायपणें अंग टाकून दिलें.

## १५ रासबिहारींचा पंजाबत्याग

दि. २० फेब्रुवारी रोजीं **सरदार जगत्सिंह** बरोबर आपल्या दोन मित्रांना घेऊन एका टांग्यांतून जात असतां पोलिसांनीं पाहिलें. एका टांग्यांतून तीन शीख एकत्र जातांना पाहातांच येथें कांहीं तरी दगा असावा अशी समजूत होऊन, पोलिसांनीं त्या टांग्याला वेढा दिला व त्यांतील उतारूंना पोलिस ठाण्यांत चलण्यास फर्माविलें; पण त्या तिन्हीही उतारूंनीं आपलीं पिस्तुलें सावरून गोळ्या झाडावयास प्रारंभ केला. बराच वेळ दोन्ही बाजूंनीं एकमेकांवर गोळ्यांचा वर्षाव केल्यानंतर त्यांतील एक शीख निसटला व दुसरा

जखमी होऊन पोलिसांच्या हातीं सांपडला. जगत्सिंह ह्या गोळा-गोळींत पोलिसांच्या हातून निसटून गेले. पुढें जात असतां अतिशय तहान लागली म्हणून ते एका नळाजवळ थांबले. नळावर पोटभर पाणी पिऊन ते तोंड व हात पुशीत उभे होते तोंच मागाहून एका मुसलमानानें येऊन त्यांच्या पायाला घट्ट विळखा घातला. बराच वेळ झटापट चालल्यानंतर अखेरीस जगत्सिंह जमिनीवर कोसळले. ते जमिनीवर पडतांच हातांत हातकड्या घालून त्यांना गिरफदार करण्यांत आलें. या झटापटींत एक ठाणेदार जखमी झाला, व एक हेड्कॉन्स्टेबल मारला गेला. साऱ्या पंजाबांत झटापटींचें व अटकांचें सतच सुरू झालें. दि. २२ फेब्रुवारीपर्यंत नुसत्या लाहोर शहरांतच तेरा व्यक्तींना अटक झाली व चार घरांच्या कसून झडत्या झाल्या. या झडत्यांत एकंदर बारा बॉम्ब्स् पोलिसांच्या हातीं लागले. त्यांतील पांच बॉंब बंगाली नमुन्याचे व इतके भयंकर होते कीं, त्यांतला एक बॉंब देखील एका सबंध रेजिमेंटचा धुव्वा उडवावयास पूर्णपणें समर्थ होता. अर्थात् हे बॉम्ब्स् बनारस येथील शचीन्द्रांच्या केंद्रांतून पंजाबमध्यें आलेले असून, रासबिहारींच्या हातून निर्माण झालेले होते हें कांहीं कोणास सांगावयास नको. अमृतसर येथील झडत्यामधून बॉंबचें पुष्कळच सामान हातीं लागलें. लुधियाना जिल्ह्यांतील झाबेवाला नांवाच्या गांवीं बॉंबगोळे तयार करण्याची एक फॅक्टरी असल्याचाही सुगावा पोलिसांना लागला. ती फॅक्टरी हस्तगत करून पोलिस परततात न परततात तोंच लोहतावादी येथेंही एक असाच कारखाना आढळून आला. रावळपिंडी येथील एक सबंध काळ्या शिपायांची पलटणची पलटणच बरखास्त करण्यांत आली. गोरे शिपाई या दिवसांत केव्हां केव्हां एकाद्या सबंध गांवालाच वेढा देत व पकडून नेऊन लोकांचा

नाना प्रकारानें छळ करीत. मूलासिंह, अमरसिंह व अमेरिकेहून आलेला एक नबाब या नांवाचा मुसलमान असे तिघेजण माफीचे साक्षीदार बनले होते. ते ज्यांचीं ज्यांचीं नांवें सांगत, त्यांना त्यांना पकडण्यांत येऊन पोलिस ठाण्यांत माहिती मिळविण्याच्या निमित्तानें त्यांचा नाना प्रकारें छळ करण्यांत येई. कोणत्याही शीखाविषयीं यत्किंचित्‌ही संशय आला कीं, त्याला तावडतोब पोलिस ठाण्यांत खेचण्यांत येत असे.

रासबिहारींनीं आपल्या भव्य उभारणीचा हा सारा विचका उघडया डोळ्यांनीं पाहिला. दुसरी कोणतीही व्यक्ती त्यांच्या जागीं असती तर तिचें मन मोडून जाऊन तिनें भावनावेगांत एक तर आत्महत्या तरी केली असती किंवा हाय खाऊन पुनश्च या असल्या कामांत पडायचें नाहीं म्हणून निवृत्तीचा मार्ग तरी स्वीकारला असता ! अथवा निदान ' हिंदुस्थानचे लोकच नादान. त्यांच्यांत कांहीं अर्थ नाहीं ' असें म्हणून स्वतःच्याच देश-बांधवांच्या नांवानें आजन्म खडे फोडीत शिष्टपणाचा जीवनमार्ग तरी पत्करला असता. कधीं काळीं परिस्थितीच्या तडाख्यांत सांपडून, या प्रकारचें आयुष्य व्यतीत करीत असलेले अनेक लोक मीं प्रत्यक्ष पाहिलेले आहेत. त्यांपैकीं कुणी स्वस्थ चित्तानें आपा-पले व्यवसाय करीत, सुखासीन आयुष्य घालवीत, क्रांतीच्या लांब लांब बाता झोकण्यांत आयुष्य व्यतीत करीत आहेत; तर कुणी साऱ्यांना शिव्या देत भावी परमेश्वरी अवताराची आराधना करण्याचा मार्ग पत्करून बसले आहेत. पण रासबिहारी हे या कोणत्याच वर्गांत समाविष्ट होण्यासारखे नव्हते. त्यांचें मन हें पोलादाच्या कांबीसारखें कणखर होतें. निराशेच्या कसल्याही धक्क्यांनीं तें कधींच वाकूं शकलें नाहीं. ' चलन्तु गिरयः कामं

युगान्तपवनाहता: । कृच्छ्रेऽपि न चलत्येव धीराणां निश्चलं मन:॥'
'युगान्तकालीं झंझावातानें मुळापासून उपटून निघालेले संकटाचे केवढालेही मोठमोठे कडे अंगावर कोसळोत; पण अगदीं जीवनमरणाच्या सीमारेषेच्या मध्यावर उभे राहाण्याचा प्रसंग जरी येऊन ठेपला तरीही धीरांचें मन कधीं विचलित होऊं शकत नाहीं.' असें संस्कृत सुभाषितकारांचें वचन आहे. स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांचा अपवाद सोडला तर रासबिहारी बोस हे भारताच्या वर्तमान इतिहासांत अशा अलौकिक धैर्याचे महापुरुष म्हणून उल्लेखितां येतील. श्रीमद् भगवत्गीतेंत भगवंतांनीं 'दु:खेष्वनुद्विग्नमना: सुखेषु विगतस्पृह: । वीतरागभयक्रोध: स्थितधीर्मुनिरुच्यते ॥' हें जें स्थितप्रज्ञाचें वर्णन केलेलें आहे त्याचा रासबिहारींच्या रूपानें जणू वर्तमान युगांत मूर्त आविष्कारच झाला होता. त्यांच्या चपल प्रतिभेनें अनेक मोठमोठे क्रांतिकट उभारले. कठोर नियतीनें, फळ ऐन हातांत पडण्याच्या वेळींच प्रत्येकदां नशिबाचे फांसे उलटे टाकून, त्यांचा प्रत्येक विशाल प्रयत्न धुळीस मिळविला. पण एकाद्या महान् शाक्तपंथीय साधकाप्रमाणें त्यांचा उत्साह कधीं मावळला नाहीं, त्यांची कर्तृत्वशक्ति कधीं मंदावली नाहीं अन् त्यांचा जोम कधीं ओसरला नाहीं. नियतीनें प्रत्येक वेळीं त्यांच्या जुन्या कल्पनेची चिता पेटवावी अन् ती जळून पुरती राख होण्याच्या आंतच रासबिहारींनीं नव्या बाळसेदार कल्पनेचें बारसें धूमधडाक्यानें साजरें करण्याच्या कार्यक्रमास पहिल्या इतक्याच उत्साहानें अन् धडाडीनें लागावें. क्रांतीवर इतका नितांत विश्वास असणारा महापुरुष विरळा. हजारदां अपयश आलें अन् फसवणूक झाली तरी भारताच्या मुक्ततेचा याशिवाय दुसरा साधनमार्ग नाहीं, असणें शक्यच नाहीं या-

बद्दल त्यांची निश्चिति होऊन चुकली होती आणि म्हणून झालेल्या चुका सुधारून पुनश्च त्याच मार्गानें जाणें इतकेंच काय तें ते आपलें कर्तव्य समजत होते.

पंजाबांतील क्रांतीच्या उभारणीची ही अशी दुर्दशा झाल्यानंतर ते एकंदर वातावरणाचा विचार करूं लागले. त्यांना असें आढळून आलें कीं, हिंदुस्थानच्या लगत असलेल्या मुसलमानी राष्ट्रांनीं हिंदुस्थानवर स्वारी करावी म्हणून जर्मन सरकार कारस्थानें करीत असून हरदयाळांच्या प्रेरणेनें राजा महेन्द्रप्रताप व बरकत उल्ला हे इराण, तुर्कस्थान इत्यादि देशांतून कारस्थानांची उभारणी करीत करीत अफगाणिस्थानांत येऊन दाखल झालेले आहेत. हिंदुस्थानांतूनही अफगाणिस्थानच्या अमीराला त्या वेळीं, ' हिंदुस्थानांत स्वारी करावयास या. तुम्ही येऊन पंजाबांत पदप्रक्षेप केलात कीं, आम्ही हिंदुस्थानांतले मुसलमान बंडाचा बावटा उभारतों ' अशा अर्थाचीं पत्रं वारंवार जात होतीं. पुढें हा साराच कट उघडकीस येऊन " रेशमी पत्राचें षड्यंत्र " या नांवानें तो बराच गाजला हें सर्वांस माहीत आहेच. वास्तविक क्रांतिकारक ज्या आकांक्षेनें प्रेरित होऊन हिंदुस्थानाबाहेरील राष्ट्राची हिंदुस्थानवर स्वारी व्हावी ही इच्छा करीत होते त्या आकांक्षेनें प्रेरित होऊन कांहीं हिंदुस्थानांतले मसलमान अफगाणिस्थानच्या अमीराला निमंत्रण पाठवीत नव्हते· त्यांना या देशांत स्वराज्य नको असून पाकिस्तान हवें होतें. जुन्या अवरंगजेबीचीं सुवर्ण स्वप्नें त्यांना पडत होतीं. अन् त्यासाठीं त्यांची सारी यातायात चालू होती. निव्वळ हिंदुस्थानच्या सर्वप्रातिनिधिक स्वराज्यासाठीं या देशांतले मुसलमान कधीं लढले आहेत असें झालेंच नाहीं. माझें आव्हान आहे इतिहासकारांना, कुणीहि तसें दाखवून यावें !

नाहींच दाखवतां यायचें. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत असें झाल्याचा देखावा दिसला होता. पण तो निव्वळ देखावा होता. तें कांहीं सत्य नव्हतें. ५७ च्या व्यापक राज्यक्रांतींत दिल्लीच्या राज्यसिंहासनावर ९० वर्षांच्या वृद्ध बहाद्दूरशहाला, मोंगलशाहीच्या त्या अत्यंत नाकर्त्या अवशेषाला, बसवितांना कृतकृत्य झाल्याचें समाधान ज्या लोकांच्या चेहेऱ्यांवर झळकलें त्याच मुसलमानांना ज्याच्या प्रतिभेंतून सत्तावनची क्रांति जन्म पावली, ज्याच्या योजकतेनें सारें राष्ट्र ' मारो फिरंगी को ' या महामंत्रानें भारून उठलें अन् ज्याच्या भरंवशावर अवघ्या तीन महिन्यांत आटोपणारी क्रांति दोन वर्षांच्या घनघोर व अटीतटीच्या स्वातंत्र्ययुद्धांत परिणत पावली त्या नानासाहेब पेशव्यांना मात्र कानपूरच्या परिसरांत पंतप्रधानकीचा अभिषेक झाला, त्या वेळीं तळमळीची पोटतिडिक उठली होती. असो. रासबिहारींना हें सारें माहीत होतें. तरीपण त्यांनीं असा विचार केला कीं, कोणत्याही हेतूनें हिंदुस्थानांतील सारा मुसलमान समाज जर क्रांतिच्या संभूय समुत्थानांत सामील व्हावयाचा संभव आहे, तर त्यासाठीं बाहेरच्या मुसलमानी राष्ट्रांची स्वारी घडवून आणून क्रांतिचा देशव्यापी भडका उडविणें पारिणामतः हिंदुस्थानच्या फायद्याचेंच आहे. दृढमूल इंग्रजी राज्ययंत्राला त्याशिवाय जबरदस्त शह मिळणें केवळ दुरापास्त आहे. लगेच त्यांनीं आपला विचार नक्की केला व कर्तारसिंग प्रभृतींना काबूलला स्वतःबरोबर येण्याची तयारी करण्याची सूचना दिली.

काबूलला जावयाचें तर तें पक्का मुसलमान होऊनच जाणें भाग होतें. हिंदु म्हणून तेथें जावयास निघणें हें एक प्राणसंकटच ! मुसलमानाचें सोंग घ्यावयाचें तर नुसता मुसलमानी परिवेष व

भाषा यांनीं प्रत्यक्ष काबूल येथें तर भागलें नसतेंच. पण काबूलच्या वाटेवरही अवश्य ती सुरक्षितता लाभणें शक्य नव्हतें. त्यासाठीं कुराणांतील कलमें व निमाज पढतां येणें अत्यावश्य होतें. रासबिहारींनीं त्या तयारीकरितां एक मौलवी जवळ बाळगला, व त्याच्याजवळून कलमा पढण्याच्या संथा घेणें सुरू झालें. सर्व प्रकारची सिद्धता झाल्यावर जाण्याचा दिवसही नक्की ठरला. पण इतक्यांत जाण्याच्या आदल्याच दिवशीं रासबिहारींचें अंतर्मन यांना सांगूं लागलें कीं, 'काबूलच्या मार्गानें जाण्यांत तुझ्या जीविताला व अंगीकृत कार्याला निःसंशय धोका आहे. मागें फीर. परत बनारसला जा.' आपल्या अंतर्मनाचा हा निर्वाळा रासबिहारींनीं परिस्थितीशीं ताडून पाहिला, अन् 'सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः ।' या न्यायानुरूप त्यांनीं काबूलला जाण्याचा विचार रहित करून परत बनारसलाच जावयाचें ठरविलें. त्यांनीं कर्तारसिंहालाही काबूलला जाण्यामध्यें धोका असल्याची स्पष्ट जाणीव करून दिली. पण उत्साहातिरेकाच्या भरांत कर्तारसिंहांनीं आपल्या या महान नेत्याचा सल्ला न ऐकतां जगत्‌सिंह व हरिनामसिंह टुण्डा या आपल्या सहकाऱ्यांसहित काबूलला प्रस्थान केलेंच. पण रस्त्यांतच त्यांचा विचार बदलून ते परत पंजाबांत आले व ओळखले जाऊन त्यांना अटक झाली. लोहशृंखलांनीं जखडलेल्या स्थितींत कर्तारांना पोलिसचौकींत आणतांच त्यांनीं कॅपटन टासकिनला हंसून म्हटलें, "मि. टासकिन, और बातें बाद में होगी, पहले कुछ खाने को तो ला दो ।" इकडे एके दिवशीं विनायकराव कापिले नांवाच्या आपल्या एका महाराष्ट्रीय सहकाऱ्याला बरोबर घेऊन रासबिहारी लाहोरहून रात्रीं ८ वाजतां बनारसकडे जाणाऱ्या गाडींतून बनारसला यावयास निघाले.

त्यांनीं ज्या दिवशीं पंजाबांतून प्रयाण केलें, त्याच्या दुसऱ्या दिवशीं त्यांचा मणीलाल या नांवाचा एक सहकारी त्यांना भेटावयास म्हणून चुकून त्यांच्या ताब्यांत असलेल्या अनेक घरांपैकीं ज्या घरावर पोलिसांची सक्त नजर होती त्याच घरांत शिरला. त्याला अटक करून पोलिस स्टेशनवर आणण्यांत आल्यानंतर पुढच्या छळाची साधारण कल्पना येतांच घाबरून जाऊन त्यानें सारा भेद सांगितला. या मणिलालच्या जबानीनंतर सरकारला एकंदर कटाच्या भयानकतेची व रासबिहारींच्या संयोजकतेची खरी कल्पना आली आणि चिल्लर खुर्दा जरी पुष्कळ हातीं आला, तरी विप्लवाचा उत्पादक नि संयोजकच जर हातीं न लागला तर असे छपन्न कट तो पुनश्च उभारूं शकेल, या जाणीवेनें सरकारकडून चंद्रनगर व बंगालमधील इतर ठिकाणांहून रासबिहारींना ओळखणारे चलाख, नि गृध्रदृष्टी गुप्तचर आणून त्यांची पंजाब ते बनारस व बनारसच्या भिन्न भिन्न विभागांतून मुबलक पेरणी करण्यांत आली. विशेषत: स्थानिक बंगाल्यांवर पोलिसांची सक्त नजर होती. बाहेरून येणारा कोणीही बंगाली, प्रथम पोलिस चौकीवर यथेच्छ छळ झाल्याखेरीज शहरांत जाऊं शकत नसे आणि तरीही रासबिहारी सुरक्षितपणें बनारसला येऊन पोहोंचले. निव्वळ स्वत:चेंच नव्हे, तर बनारस येथें त्यांच्या आज्ञेप्रमाणें येऊन राहिलेल्या साऱ्याच क्रांतिकारकांचें ते स्वत:च्या नि क्रांतिकारक पक्षाच्या मर्मस्थानीं सुरी खुपसावयास टपलेल्या सरकारपासून संरक्षण करीत होते.

पंजाबांतील क्रांतिकारकांपैकीं **डॉ. मथुरासिंह** आपल्या दोन तीन सहकाऱ्यांसह काबूलला गेले. **विष्णु गणेश पिंगळे** अजून सुरक्षित होते. रासबिहारींच्या सूचनेनुसार ते यानंतर बनारसकडे यावयास निघाले. पण सरळ न येतां रस्त्यांत मेरठच्या

छावणीजवळ उतरून तेथें त्यांनीं सैनिकांच्यामध्यें विप्लवाच्या प्रचारास प्रारंभ केला. या छावणींत असतांना त्यांची एका सामान्य मुसलमान लष्करी अधिकाऱ्याशीं ओळख झाली. हा गृहस्थ बोलण्यांत फार अघळ पघळ होता. त्यानें पिंगळ्यांना बंड उभारण्याच्या कामांत अतिशय उत्साह दाखविला व मेरठची सारी छावणी विद्रोहांत सामील करून देण्याचें काम स्वतः होऊन पत्करलें; पिंगळ्यांना त्याच्याविषयीं अतिशय विश्वास वाटला व ते त्याला घेऊन बनारसला रासूदादांच्याकडे आले. रासबिहारींना पिंगळ्यांनीं सारी हकिकत सांगून मेरठच्या छावणींत पुनश्च जाण्याचा आपला मनोदय त्यांना कळविला. अतिशय भयानक स्वरूपाच्या कांहीं बॉम्बसची त्यांनीं रासबिहारींच्याजवळ मागणी केली व मेरठच्या छावणींतून बरोबर आणलेल्या त्या मुसलमान गृहस्थाचा त्यांनीं रासबिहारींशीं परिचय करून दिला. रासबिहारींनीं या गृहस्थाकडे एकदां आपादमस्तक निरखून पाहिलें व मनाशीं निश्चय करीत पिंगळ्यांना सांगितलें कीं, " तुम्ही बनारस सोडून तूर्त कुठेंच जाऊं नये, असें माझें तुम्हाला निक्षून सांगणें आहे. तुम्ही अकारण फसणार आहांत. तुमचा हा नवा साथीदार मला अतिशय बदमाष दिसतो. " पण पिंगळे भावनाविवशतेनें कांहींच ऐकून घ्यावयास तयार होईनात. शेवटीं रासबिहारींनीं " दैव तुमचें अन् राष्ट्राचें ! त्याला मी तरी काय करणार ?" असें म्हणून पिंगळ्यांना अतिशय भयंकर स्वरूपाचे दहा बॉम्ब देऊन निरोप दिला. हे बॉम्ब इतके भयानक होते कीं, त्यांतला एक एक बॉंब एक एक रेजिमेंट समाप्त करूं शकत होता. अखेरीस रासबिहारींचाच अंदाज खरा ठरला. त्या गृहस्थानें पिंगळ्यांना मेरठच्या छावणींत नेऊन त्यांना बॉम्बसहित पकडून सरकारच्या स्वाधीन

केलें. पुढें मेरठच्या छावणींत दहा पंधरा सैनिकांनाही पिंगळयांशीं संबंध ठेवण्याच्या अपराधावरून फांसावर चढविण्यांत आलें. अंबाला, बनारस, फिरोजपूर येथील लष्करी छावणींतल्या कित्येक शिपायांनाही याच सुमारास रासबिहारींच्या कटांत सामील असल्याच्या अपराधावरून गोळी घालून ठार मारण्यांत आलें होतें. **भाई परमानंदांनाही** याच सुमारास अटक करण्यांत येऊन लाहोर कटाचा प्रख्यात खटला उभारण्यांत आला. या खटल्यांत ६१ अभियुक्त होते. सरकारतर्फेच्या साक्षीदारांची संख्या ४०४ असून, आरोपींच्यातर्फे २२८ साक्षीदार होते. आरोपींपैकीं २४ जणांना फांशीची शिक्षा होऊन बाकीच्यांना काळयापाण्यावर पाठविण्यांत आलें. फांसावर चढतांना बागी कर्तारसिंहांचें वजन १० पौंडांनीं वाढलें होतें. पुढें या खटल्यांत कर्तारसिंह व पिंगळे सोडून बाकीच्यांनीं अपील केलें. १६ नोव्हेंबर १९१५ रोजीं या अपीलाचा निकाल लागून २४ पैकीं ७ जणांच्या फांशीच्या शिक्षा कायम होऊन बाकीच्यांच्या शिक्षेचें काळ्या पाण्यांत रूपांतर करण्यांत आलें.

## १६. शचींद्रनाथ संन्याल व बनारस षड्-यंत्र

पंजाबमध्यें ज्या वेळीं विप्लवाच्या वार्ता पसरूं लागल्या होत्या, त्याच वेळीं बनारस हें केंद्र करून रासबिहारींनीं बंगाल, बिहारपासून मध्यप्रांतापर्यंतचा विभाग संघटित करावयास प्रारंभ केला होता. १९१५ च्या जानेवारी महिन्यांत दामोदरस्वरूप सेठ यांची नियुक्ति प्रयाग येथें करून त्यांच्याकडे युक्त प्रांतांतल्या क्रांतिकारक संघटना सोपविण्यांत आल्या. विनायकराव कापिले यांना एका सहकाऱ्याबरोबर पंजाबांत पाठविण्यांत आलें होतें, तर आणखी दोन व्यक्तींना बॉंबची पेरणी करण्यासाठीं बंगालमध्यें

पाठविण्यांत आलें. विभूति व प्रियानाथ यांना बनारस येथील लष्करी छावण्यामधून विप्लवाचा प्रसार करण्याचें काम देण्यांत आलें; नलिनी मोहन मुकर्जी यांच्यावर मध्यप्रांतांतील काम सोपवून विशेषत: जबलपूर विभागांतील लष्करी छावण्यांतून विद्रोहाचा प्रचार करण्यासाठीं त्यांना आज्ञापिण्यांत आलें. शचींद्र संन्यालांनीं बाकीपूर ( पाटणा ) येथें याच सुमारास एक सामिति स्थापन केली. मागें सांगितल्याप्रमाणें शचींद्रनाथ पंजाबांतून परत आल्यानंतर रासबिहारींनीं बनारसच्या केंद्राचीं सारीं सूत्रें त्यांच्या ताब्यांत देऊन स्वत: पंजाबांत प्रयाण केलें होतें. शचींद्रांनीं १४ फेब्रुवारी १९१५ रोजीं विनायकराव कापिले व मणिलाल यांच्या स्वाधीन अठरा बॉम्बसचें एक पार्सल करून त्यांना पंजाबमध्यें पाठविलें. त्यांना पाहातांच रासबिहारींनीं त्यांना सांगितलें कीं सशस्त्र उठावणीची तारीख २१ फेब्रु. १९१५ ही ठरली असून तसें शचीन्द्राला व त्याच्या करवीं विप्लववाद्यांच्या सर्व केंद्रांना कळविण्याची व्यवस्था करावी. उठावणी सर्व ठिकाणीं एकाच दिवशीं एकाच क्षणीं झाली पाहिजे. विनायक कापिले यांनीं आपल्या नेत्याच्या आज्ञेनुरूप बनारसला शचींद्रांना ही तारीख कळविली व शचींद्रांनींही साऱ्या केंद्रांना ती कळविण्याची व्यवस्था केली. योजना अशी होती कीं, तारा तुटल्याच्या व रेल्वेलाईन्स उध्वस्त झाल्याच्या बातम्या पंजाबमधून आल्या कीं, बनारसला उठावणी करावी व बनारसमधून याच तऱ्हेच्या वार्ता आल्या कीं, साऱ्या मध्य व उत्तर भारतानें पेट घ्यावा. पण कृपालसिंगाचें प्रकरण व पंजाबी क्रांतिकारकांचा गैराशिस्त गलथानपणा यामुळें पंजाबांतील साऱ्याच योजनांची कशी वाताहत झाली हें मागें सांगितलेंच आहे. मध्यंतरीं २१ तारखेची जी १९ तारीख करण्यांत आली होती

ती मात्र रासबिहारींना अनेक कारणास्तव शचींद्रांना कळवितां येणें शक्य झालें नाहीं. इकडे ठरल्याप्रमाणें दि. २१ फेब्रुवारी १९१५ रोजीं दुपारपर्यंत पंजाबांतील विप्लवाची कांहींच वार्ता न समजल्यामुळें अस्वस्थ होऊन शचींद्रनाथ बनारस येथील स्टेशन-वर गेले. त्यांची अशी अपेक्षा होती कीं, स्टेशनवर तार तुटल्याचें प्रमाण मिळेल व उठावणीचा रासबिहारींचा संदेश प्रत्यक्ष अंमलांत आणतां येईल. पण स्टेशनवर सर्व कांहीं ठाकठीक होतें. आशंकेनें शचींद्र तसेच तार ऑफिसमध्यें गेले. पण तेथेंही धांदलीचें यत्किंचितही चिन्ह दिसून आलें नाहीं. ठरलेल्या योजनेंत एका-एकीं इतका बदल होऊंच कसा शकतो हें शचींद्रांच्या पुष्कळ वेळ ध्यानांतच येईना. उदास व खिन्न मनानें परतत असतांना रस्त्यांत त्यांनीं 'पायोनियर' नांवाचें वर्तमानपत्र विकत घेतलें. तेव्हां कुठें त्यांना कृपालसिंहाचें प्रकरण, अचानक झालेल्या धर-पकडी अन् एकंदर साऱ्याच प्रकरणाचा झालेला विचका, या साऱ्या गोष्टी समजून आल्या. 'पायोनिअर' मधील तो सारा वृत्तांत वाचून त्यांनीं एक प्रदीर्घ अन् खेदमिश्रित उसासा सोडला. स्वातंत्र्यप्राप्तीचा हा महान प्रयत्न फुकट व्यर्थ गेल्याचें पाहून त्यांना अतिशय दुःख झालें !

जी हानी झाली होती ती भरून काढतां येणें केवळ अशक्यच होतें; पण झाली याहून अधिक हानी होऊं देऊं नये अशी निदान स्वतःच्या केंद्रापुरती तरी खबरदारी घेणें त्यांना अत्यावश्यक होतें. म्हणून सारा खेद अन् विमनस्कता एका क्षणांत जिरवून ते ह्या उद्योगास लागले. पंजाबांतील धरपकडीचें वर्तमान वाचून बनार-सलाही याच प्रकारची पुनरावृत्ति होईल असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें व पहिल्या प्रथम आपल्या साऱ्या सहकाऱ्यांच्या

गांठी घेऊन त्या साऱ्यांचें एकदम स्थलांतर करविलें. स्वतःचा अंदाज किती बरोबर होता याचें प्रत्यंतर त्यांना दुसऱ्या दिवशीं सकाळच्या अगदीं ब्राह्म-मुहूर्तावर मिळालें. स्वतः त्यांच्या व सहकाऱ्यांच्या निवासस्थानावर पोलिसांनीं छापा घातला. पण आधींच घेण्यांत आलेल्या विषेश प्रकारच्या सावधागिरीनें व्यक्ती व साधनें यांपैकीं कांहींच सरकारच्या हातीं न लागतां शचीन्द्र साफ बचावले. बंगाली टोल्यांतील एका गुप्त जागीं या लोकांच्या नेहमीं गांठीभेटी होत अन् रासबिहारींच्या नेतृत्वाखालीं वेगवेगळ्या योजना आखण्यांत येत. या वेळीं बंगाल, बिहार व संयुक्तप्रांत येथील बहुतेक क्रांतिकारक बनारसला रासबिहारींच्या सभोंवतीं एकत्र आले होते. असा योग पुनश्च आला नाहीं. रासबिहारी या वेळीं एक महिन्याहून अधिक काळ बनारसला राहिले. त्यानंतर मात्र सगळ्यांना वेगवेगळ्या ठिकाणीं पाठविण्याची योजना त्यांनीं आंखली. पाहिल्या प्रथम शचींद्रनाथ संन्यालांना बंगाली क्रांतिकारकांसहित बंगालमध्यें पाठविण्यांत आलें. एकंदर सर्वच लोकांची रासबिहारींनीं हेतुपूर्वक पांगापांग केली. प्रथम त्यांच्या सहकाऱ्यांच्या ध्यानांत त्यांचे हेतु न आल्यामुळें ते बुचकळ्यांत पडले. पण ही मंडळी बनारस सोडून गेल्यानंतर अवघ्या एक आठवड्यानंतरच त्यांच्या नवीन स्थानावर पोलिसांचे छापे पडूं लागल्यानंतर मात्र त्यांना या नवीन धोरणाची कल्पना आली. विनायकराव कापिले या सुमारास बनासरलाच होते. एके दिवशीं ते गंगेवर स्नानासाठीं गेले असतांना त्यांच्या घराला पोलिसांनीं वेढा घातला. स्नान करून व ओल्या कपड्यांचे पिळे खांद्यावर टाकून हा वरून साळसूद दिसणारा ब्राह्मण शंकराचार्यांचीं स्तोत्रें म्हणत येत असतांना त्याच्या कानावर ही बातमी पडली मात्र; तोंच तो एकदम

अंतर्धान पावला! असो!

## १७. दिल्ली येथें शचीन्द्रनाथ

नुकतेंच सांगितल्याप्रमाणें शचीन्द्रनाथ संन्याल हे बंगालमध्यें येऊन कलकत्ता येथें राहूं लागल्यानंतर थोड्याच दिवसांत त्यांना रासबिहारींची आज्ञा आली कीं, 'तुम्ही तावडतोब दिल्लीला जाऊन तेथील परिस्थितीचा वृत्तांत कळवावा.' या आज्ञेनुसार शचींद्र कलकत्ता सोडून दिल्ली येथें जावयास निघणार तोंच सरकारी गुप्तचरांना त्यांच्या निवासस्थानाचा पत्ता व प्रयाणाची सिद्धता यांचें वृत्त कळलें. तावडतोब त्यांच्या घरावर पोलिसांची धाड आली व आजूबाजूचे सारे रस्ते रोखले गेले. पण असें सांगतात कीं, 'पुलिस शचीन्द्र को पकडने आई तो वह पुलिसके देखते देखते ही छतों छतों भागता हुआ गायब हो गया।' तात्पर्य, पोलिसांच्या अन् सरकारी नियंत्रणाच्या साऱ्या पाशांना वंचित करून शचीन्द्र सुखरूपपणें दिल्ली येथें येऊन पोहोंचलें. या वेळीं त्यांच्या बरोबर प्रतापसिंह या नांवाचा एक उमदा राजपूत चारण नवयुवक सहकारी होता. दिल्लीच्या राजनगरींत पदन्यास करतांच शचीन्द्रांना मेरठच्या छावणींत विष्णु गणेश पिंगळे पकडले गेल्याची वार्ता प्रथम कळली. पिंगळ्यांचें भवितव्य त्यांच्या नजरेसमोर दिसूं लागलें. त्यांच्या डोळ्यांत अश्रूंची गर्दी झाली व पावलें जड पडूं लागलीं. पण जो स्वातंत्र्यसाधनेचा महान् क्रांतियोग त्यांनीं होऊन पतकरला होता, त्यांत या साऱ्या गोष्टींना स्थानच कुठें होतें? किंबहुना 'पांडवा, हा अग्निप्रवेशशुचि नित्य नवा। भ्रतारेवीण करावा। तो हा योगु॥' या श्रीज्ञानराजांनीं वर्णन केलेल्या हटयोगाच्या दुर्दांत साधनेंत अन् शचीन्द्रांच्या साधनेंत फरक असा नव्हताच. मन पाषाणासारखें करून त्यांनीं

तुटलेल्या मुक्ताहाराप्रमाणें गालावर ओघळणाऱ्या अश्रुसरी पुसून काढल्या. एका प्रदीर्घ निश्वसितानें हृदयांतली सारी दारुण वेदना बाहेर काढून लावली अन् दिल्ली येथील कार्याचीं सूत्रें स्वतःच्या हातांत घेतलीं.

पहिल्या दिल्ली षड्यंत्राच्या खटल्यांत दिल्ली येथील विप्लववादी आन्दोलनाचे प्रणेते नि अधिनायक मास्टर अमीरचंद व अवधबिहारी हे भाई बालमुकुंद व वसंत कुमार विश्वास या आपल्या सहकाऱ्यांसह वधस्तंभावर लटकल्याचें वृत्त मागें सांगितलेंच आहे. त्यांच्यानंतर या आंदोलनाचे सूत्राधार **लक्ष्मीनारायण व गणेशीलाल खस्ता** हे होते. लक्ष्मीनारायणजी हे निष्कलंकी संप्रदायाचे एक धार्मिक महंत असून गणेशीलाल खस्ताजी हे अत्यंत उत्कृष्ट कवि होते. त्यांच्या वीररसपूर्ण कवितांतलें ओज इतकें उत्तेजक असे कीं, लाला हरदयाळ आपल्या गदर पत्रांत त्यांच्या कविता अग्रभागीं छापीत असत. शचीन्द्र दिल्लींत येत असल्याची वार्ता या दोघांना बनारसच्या केन्द्रांतून पूर्वींच कळविण्यांत आलेली असल्यामुळें त्यांनीं घर वगैरे घेऊन ठेवण्याची प्रथमपासूनच दक्षता घेतलेली होती. शचीन्द्र येतांच त्यांनीं या दोघांशीं पुढच्या योजनेसंबंधीं चर्चा करून त्यांच्या मदतीनें नव्या-जुन्या अशा सर्वच कार्याकर्त्यांत नीट परिचय करून घेतला. शचीन्द्र या वेळीं पंधरावीस दिवस दिल्लीस होते. चार पांच दिवसानंतर कलकत्याहून बरोबर आणलेल्या प्रतापसिंह या चारण राजपूतला त्यांनीं राजपुतान्यांतील विप्लववादी केन्द्रांची पाहणी करण्याच्या कामगिरीवर जयपूर येथें पाठविलें. प्रतापसिंह लवकरच तिथून परत आल्यानंतर नव्या सूचना व साधनसामुग्री देऊन त्याला पुनश्च संघटनकार्यासाठीं राजपुतान्यांत पाठविण्यांत आलें. शचींद्रांच्या आगमनानें खस्ताजी अतिशय

उत्साहित झाले होते. त्यांनीं लवकरच दिल्ली येथील मुसलमान क्रांतिवाद्यांच्या संघटनेशीं शचीन्द्रनाथांचा परिचय करून दिला. मुसलमान विप्लववाद्यांची ही संघटना बाहेरच्या आक्रमक वृत्तीच्या स्वतंत्र इस्लामी राष्ट्रांच्या सहानुभूतीच्या भरंवशावरच स्वतःच्या कार्याचा प्रपंच थाटून बसलेली होती. इ. स. १९११ मध्यें इटाली व तुर्कस्थान यांच्यांत युद्ध जुंपल्यानंतर हिंदुस्थानांतील मुसलमानांनीं स्वतःचें एक शुश्रूषापथक जखमी तुर्कांच्या सेवा-शुश्रूषेसाठीं म्हणून तुर्कस्थानला पाठविलें होतें. या पथकामध्यें पंजाब येथील ' जमीदार ' नांवाच्या पत्राचे संपादक जाफरअल्लीखां या नांवाचे एक गृहस्थही होते. स्वतंत्र तुर्कराष्ट्रांत मिळालेल्या सन्मानाचा या गृहस्थाच्या अंतःकरणावर ज्वालाग्राही परिणाम होऊन मुस्लीम विश्वबंधुत्वेची ( Pan-Islamic ) कल्पना त्यांच्या हृदयांत थैमान घालूं लागली. तुर्कस्थानच्या राष्ट्रघटकांशीं त्यांनीं या बाबतींत विचारविनिमय करून त्यांच्या जवळून बरेंचसें आर्थिक साहाय्य घेतलें व हिंदुस्थानांत येतांच मुसलमानांच्या गुप्त संघटनेस प्रारंभ केला. यानंतर या संघटनेस तुर्कस्थानकडून गुप्त रूपानें पुष्कळच साहाय्य मिळत असे. हिंदुस्थानांतील साऱ्याच मुसलमान क्रांतिकारकांच्या संबंधानें ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, त्यांपैकीं कुणीही भारतीय शुद्ध स्वातंत्र्याचा पुरस्कर्ता नव्हता. बाहेरच्या मुसलमानी राष्ट्रांच्या साहाय्यानें या देशांत मुसलमानी सलतनतीची प्रतिष्ठापना करणें यावांचून त्यांचा दुसरा कोणताही हेतु नव्हता. हिंदुस्थानासुद्धां जगांतल्या सर्व मुसलमान राष्ट्रांचा एक महान् संघ निर्माण करून त्या संघटित इस्लामी विश्वाच्या टाचेखालीं सारें ज्ञात जगत् आणावयाचें; व जुन्या तैमूरलंग आणि चेंगीजखानाचे दिवस पुनरुज्जीवित करावयाचें उद्दिष्ट, त्यांच्या

डोळ्यासमोर होतें. दिल्लीच्या या मुसलमानी दलानें शचींद्रनाथांना आर्थिक सहाय्य दिलें. दोनचारदां भेटी व चर्चा झाल्यानंतर त्यांच्यांत असा करार ठरला कीं, शचींद्रांनीं त्यांना बनारसच्या केंद्रांतून त्यांच्या मागणीप्रमाणें भयानक स्वरूपाचे बॉंबगोळे पुरवावे व त्याच्या मोबदल्यांत या दलानें शचीन्द्रांना त्यांच्या मागणीच्या अनुरूप पिस्तुलें, रिव्हाल्व्हर्स, काडतुसें पुरवावीं.

याप्रमाणें दिल्लीच्या कार्याला स्वरूप येऊं लागलें न लागलें तोंच दैवानें शचीन्द्रांचा दावा साधून, त्यांना भयंकर स्वरूपांत आजारी पाडलें. त्यांना वाटलें, आज ना उद्यां आपल्या प्रकृतीला आराम पडेल व आरंभिलेल्या कार्याचीं सूत्रें पुनश्च आपण आपल्या हातीं घेऊं. पण अपेक्षित उतार पडण्याऐवजीं आजाराचें प्रमाण वाढतेंच दिसूं लागलें. वास्तविक या वेळीं शचीन्द्रांनीं एकवार बनारसला रासबिहारींच्याकडे जाऊन येणें अत्यावश्यक होतें. पण त्यांच्यावर संयुक्तप्रांत सरकारनें वॉरंट सोडलेलें असल्यामुळें त्यांना आजारी स्थितींत बनारसला जाण्याचा विचार रहित करणेंच क्रमप्राप्त होतें. अखेरीस नाइलाजास्तव दिल्लीचें काम अर्धवट सोडून शचींद्रनाथ प्रतापसिंहाला बरोबर घेऊन बंगालमध्यें गेले. खास कलकत्त्याला जाणें धोक्याचें असल्यामुळें कलकत्त्याजवळील एका खेडेगांवांत, अनुशीलन समितीच्या एका उपकेंद्रांत त्यांनीं आश्रय घेतला. पंधरा दिवस तेथें शचीन्द्र खाटेवर पडून होते. प्रतापसिंह त्यांचा निरोप घेऊन लवकरच राजपुतान्यांतील कामगिरीवर निघून गेला. बंगाल्यांतील क्रांतिकारकांचे एक नेते श्री. नगेंद्रनाथ दत्त ऊर्फ गिरिजाबाबू हे त्या ठिकाणीं त्यांची सेवाशुश्रूषा करीत असत. आजारांतून थोडे बरे झाल्यावर त्यांनीं व शचीन्द्रांनीं मिळून एकंदर परिस्थितीचें समालोचन केलें. त्यांत त्यांना असें आढळन

आलें कीं, रासबिहारींच्या पाठीमागचे सरकारी पाश अधिकाधिक कुशलतेनें फेकले जात असून त्यांनीं यापुढें साहस पत्करून हिंदुस्थानांत राहाणें धोक्याचें आहे. कार्याच्या व त्यांच्या व्यक्तित्वाच्याही सुरक्षिततेच्या दृष्टीनें त्यांनीं हिंदुस्थान सोडणेंच श्रेयस्कर आहे. लगेच शचींद्र नगेंद्रांना घेऊन बनारसला आले व त्या दोघांनाही रासबिहारींना भारताचा—त्यांच्या हृदयांतील साऱ्या कोमल भावनांचें अन् अनेक अत्यद्भूत साहसी कृत्यांचें एकमात्र केंद्रस्थान अन् स्फूर्तिनिधान ठरलेल्या त्यांच्या पवित्र मातृभूमीचा-कार्यासाठींच पण परित्याग करण्याची विनंती केली.रासबिहारींनीं प्रथम ती गोष्ट हसून टाळून दिली. पण ते दाघे ऐकेचनात, तेव्हां मात्र रासूदादा त्यांच्यावर किंचित् रागावलेही. शेवटीं शचींद्रांनीं त्यांना असें सांगितलें कीं, ' हिंदुस्थानांत सामुदायिक सशस्त्र उठावणी करण्याचे तुमचे सारे प्रयत्न विफल ठरलेले आहेत. तरी पण देशाच्या मुक्ततेचा हा एकच मार्ग असल्याकारणानें सतत त्याचीच कास धरणें अवश्य आहे, हें तुमचें तत्त्वज्ञान आम्हांला मान्य आहे. पण ब्रिटिश राज्यतंत्रासारख्या सुसंयत आणि यंत्रसिद्ध साम्राज्याशीं टक्कर देणें ही सामान्य गोष्ट नाहीं. निव्वळ हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत उठावणी करून आपलें ईप्सित सफळ होणार नसून त्यासाठीं आपल्याला बाहेरच्या स्वतंत्र राष्ट्रांतून शस्त्रास्त्र-सामुग्रीचा अवश्य त्या प्रमाणांत पुरवठा होणें व चार दोन प्रबळ राष्ट्रांचें नैतिक आणि प्रत्यक्ष असें या उठावणीला साह्य होणें ही गाष्ट आपलें ईप्सित साध्य होण्याच्या दृष्टीनें अत्यंत अवश्य आहे. हरदयाळ हें कार्य करीत असत; पण आतां तुमच्यासारख्या खंबीर अधिनायकावांचून हें महत्वपूर्ण कार्य दुसरा कोणीही पार पाडूं शकणार नाहीं. तुमचें हिंदुस्थानांतलें

कार्य आम्ही पार पाडतों; पण हें महत्त्वाचें कार्य उचलायला तरी तुम्ही हिंदुस्थानाबाहेर जाणें अत्यावश्यच नाहीं का ?' रासबिहारींनाही हा युक्तिवाद पटला, अन् शचींद्र अन नगेंद्र या आपल्या सहकाऱ्यांसहित हिंदुस्थानच्या किनाऱ्याला कायमचा रामराम ठोकावयाच्या उद्देशानें १९१५ सालच्या एप्रिल महिन्यांत ते कलकत्त्याला येऊन दाखल झाले.

## १८. रासबिहारींचा भारताला अखेरचा प्रणाम !

कलकत्त्याच्या अनुशीलन समितीच्या तर्फे यतींद्रनाथ चट्टोपाध्याय ( प्रख्यात जतीन मुकर्जी ) यांनीं रासबिहारींना वाटखर्चासाठीं एक हजार रुपये दिले. इतर क्रांतिकारक संस्थांकडूनही त्यांना पुरेशी मदत मिळाली व एके दिवशीं शचींद्र संन्याल व नगेंद्र यांनीं रासबिहारींना दुपारीं दोन प्रहराच्या वेळीं एका जपानी आगबोटीवर छद्मवेषानें चढविलें. सजल नेत्रांनीं या सस्यशामला भारतमातेच्या शामल तनूवर, त्या वेळीं तात्पुरती वाटलेली, पण आतां अखेरचीच ठरलेली दृष्टि टाकून, रासबिहारींनीं भरल्या अंतःकरणानें तिला अखेरचा प्रणाम केला ! ! शचींद्रांना अखेरचीच कडकडून घट्ट मिठी मारली. नगेंद्रांनीं अखेरचें प्रेमभरित हस्तांदोलन केलें. यतींद्रांना अखेरचें न्याहाळलें. जपानी जलयान आस्तें आस्तें मार्ग आक्रमण करूं लागलें. रासबिहारी हळूहळू भारतमातेच्या प्रेमळ अंकाश्रयापासून सुदूर लोटले जाऊं लागले.

हिंदुस्थानचा किनारा सोडल्यानंतर सुखरूपपणें रासबिहारी जपानमध्यें येऊन पोहोंचले. जपानमधील ब्लॅकड्रेगन या संस्थेचे प्रमुख व वरच्या दर्जाचे लष्करी अधिकारी टोयामा यांनीं त्यांना लवकरच आश्रय व संरक्षण दिलें. उघडपणानें ते जपानमध्यें वावरूं लागतांच ते आपल्या हातावर तुरी देऊन निसटल्याचें

ब्रिटिश सरकारला कळून येऊन त्या सरकारच्या अंगाचा अगदीं तिळपापड उडाला. सिंह सांपळा लाथाडून बाहेर संचार करायला लागल्याचें कळतांच दस्यू दांतओठ चावूं लागले. पण त्यानें आतां स्वतःच्या ओठावरची कातडी सोलून निघण्यापलीकडे दुसरें काय होणार होतें ? कारण कीं, आंतरराष्ट्रीय कायद्याच्या नियमाप्रमाणें रासबिहारी फरारी कैदी असले तरी आतां त्यांच्यावर जपानची सत्ता होती; ब्रिटिशांची नव्हे. या आंतरराष्ट्रीय कायद्याचे नियम कलंकित करून सावरकरांना जसें ब्रिटिशांनीं बळजबरीनें जखडून नेलें, तो शिरजोरपणा करणेंही आतां ब्रिटिशांच्या हातीं उरलें नव्हतें. एक, मुळांतच फ्रान्सच्या भूमीवर पाऊल टाकणें अन् जपानच्या भूमीवर पाऊल टाकणें या दोन्ही गोष्टी एक नव्हत्या. दुसरें, सावरकर एकाकी व आश्रयहीन होतें, तर रासबिहारी त्यांच्या अगदीं उलट स्थितींत होते. फ्रेंच राष्ट्राला कळण्याच्या पूर्वींच सावरकर पुनश्च जखडले गेले असल्यामुळें इभ्रतीच्या प्रश्नावर वादविवाद करण्यापलीकडे त्या वेळीं फ्रेंच राष्ट्राला त्यांच्या बाबतींत दुसरें कांहीं करतां येण्यासारखें नव्हतें. तर रासबिहारींना बोट लावणें म्हणजे वस्तु आपल्या हातीं नसतांना श्वेतकाय, युरोपियनांचा ज्वलन्त द्वेष रक्तांत भिनलेल्या व प्रबल पाश्चात्य राष्ट्रांइतक्याच शस्त्रास्त्रसंनद्ध असलेल्या जपानशीं दंड थोपटून द्वंद्व युद्धालाच पर्यायानें तयार होण्यासारखें होतें. तात्पर्य, रासबिहारींचा जो प्रश्न बहादूर इंग्रज सरकार देशद्रोहाचें अमूप पीक पिकत असलेल्या या हिंदुस्थान देशांत अवघ्या साडेसात हजार रुपयांत सोडवूं पहात होतें, तो आतां कोट्यवधि रुपयांच्या युद्धखर्चाचा प्रश्न होऊन बसला होता. इंग्रजी रक्ताचा एक सूक्ष्मातिसूक्ष्म बिंदूही जमिनीवर न सांडूं देतां, ब्रिटिश सरकारला गुन्हे-

गारीची काळी टोपी डोक्यावर चढवून रासबिहारींना कुजलेल्या कुत्र्याच्या गतीनें फांसाच्या दोरीला लटकावून देण्याची इच्छा होती. पण आतां परिस्थिति अशी उत्पन्न झाली होती कीं, ज्या वेळीं लक्षावधि इंग्रजांच्या रक्ताचे पाट वाहूनही रासबिहारींच्या नखाग्राला देखील धक्का लावणें संशयातीत नव्हतें. अशा स्थितींत या धूर्त सरकारचें माथें ठणठणूं लागलें असल्यास त्यांत नवल तें काय आहे ?

सरळ रीतीनें रासबिहारींना पंजरबद्ध करतां येईना म्हणून तत्कालीन युद्धपरिस्थितीचा या बाबतींत उपयोग करून घ्याव-याचें इंग्रजांनीं ठरविलें. १४ च्या महायुद्धांत जपान ब्रिटिशांच्या बाजूनें जर्मनीविरुद्ध युद्ध करीत होता. या दोस्तीचा फायदा घेऊन या जगद्विख्यात फरारी कैद्याची मागणी ब्रिटिशांनीं जपानकडे केली. या दोस्तीच्या मागणीला जपान सरकारनें होकार भरला. कारण राजनीतीची दीक्षा कुटिल पाश्चात्यांच्याकडूनच जपाननें घेतली होती. असें सांगतात कीं, **टोयामा** यांचें वैयक्तिक वजन अन् त्यांचें संरक्षण यामुळें कोणीही जपानी अधिकारी जपानच्या होकारानुरूप रासबिहारींना त्यांच्या घरून काढून ब्रिटिश सरका-रच्या ताब्यांत देऊं शकला नाहीं. राजनीतिज्ञांना या विधानांतलें रहस्य स्पष्ट करून सांगण्याचीच आवश्यकता आहे काय ? जपान-मधील राष्ट्रभावना, राजाज्ञेचें अनुल्लंघनीयत्व, लष्करी कायद्याचें कडक नियंत्रण अन् त्या लोकांची संस्कृति या गोष्टी ध्यानांत घेतल्या तर जपानी राज्यतंत्रानें पक्केपणानें एक विशिष्ट निर्णय घेतल्यानंतर तो फिरविण्याची एकट्या टोयामाची छाती होती असें मानणें अथवा टोयामांनीं त्याविरुद्ध आपलें मत राखणें अन् त्यानंतरही राजदंड अथवा आत्महत्त्या यापैकीं एकादी प्रकाराला

बळी न पडतां मान ताठ करून जपानच्या राजरस्त्यावरून चालणें यापैकीं प्रत्येक गोष्ट खरी मानणें माझ्या मतें धाडसी व मूर्खपणाचा उच्चांक गाठण्यासारखेंच आहे. सर मायकेल ओड्-वायर यांचे शरीरसंरक्षक सुध्दां ज्यानें फितविले, लाहोर ते सिंगा-पूर अन् जयपूर ते चंद्रनगरपर्यंत ज्यानें विणलेलें कटाचें जाळें केवळ 'दैवं चैवात्र पंचमम्' मधेंच उभें राहिलें नसतें तर साऱ्या ब्रिटिश साम्राज्याच्या तिळातिळाएवढ्या ठिकऱ्या उडवावयास पुरेसें होतें, साधनहीन अवस्थेंत सुध्दां एका लहानशा बॉंबनें एक संपूर्ण रेजिमेंट खलास व्हावें असे भयानक बॉंब्स ज्याच्या प्रति-भेच्या शास्त्रीय उन्मेषणांतून बाहेर पडले, त्या महान क्रांतिकार-काला, तो आपण होऊन आश्रयार्थ घरीं चालून आला असतां, बृहत्आशियाच्या महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन दलित कृष्ण-वर्णीयांच्याकडून उन्मत्त श्वेतद्वीपाधिपतींना ठेचून काढावयास सोत्सुक असलेला जपान, सोडून देण्याइतका अन् फुकट मरणी माराविण्याइतका निःसंशय वेडगळ नव्हता ! विस्तारानें भव्य पण मनानें जीवन्मृत असलेल्या तत्कालीन चीनमध्यें ही गोष्ट सहज शक्य झाली असती, पण विश्वविजयाच्या आकांक्षेनें प्रेरित झालेल्या तत्कालीन जपानमध्यें ही गोष्ट सर्वस्वीं अशक्य होती.

## १९. क्रांतीच्या उभारणीचे विफल प्रयत्न.

जपानमध्यें १९१५ च्या एप्रिलमध्यें पाऊल ठेवतात न ठेव-तात तोंच रासबिहारींनीं शचींद्रांशीं झालेल्या बोलण्याप्रमाणें येत्या डिसेंबर महिन्यांत हिंदुस्थानांत सशस्त्र उठावणी करावयाचा निश्चय करून शस्त्रास्त्रांची प्रचंड प्रमाणावर निर्यात करावयाचें स्वतःकडे असलेलें काम पार पाडावयास प्रारंभ केला. या वेळीं जर्मन कौन्सलच्या अनुरोधानें थिओडोर हेल्फरिच हिंदुस्थानांत

शस्त्रास्त्रांची प्रचंड प्रमाणावर पाठवणी करण्याच्या योजनेंत होते. रासबिहारींचा नि थिओडोर हेल्फरिच (Theodor Helfferich) यांचा चांगला परिचय होता. रासबिहारींनीं या वेळीं जी योजना आंखली ती अशी होती कीं, जर्मनीहून एका सुभव्य व लढाऊ रणतरीनें येऊन प्रथम अंदमान बेटाच्या पोर्ट ब्लेअरवर हल्ला करून तेथें काळ्या पाण्याची कठोर शिक्षा भोगत असलेल्या साऱ्या कैद्यांची सुटका करावी व त्यांना घेऊन लगेच ब्रह्मदेशावर आक्रमण करावें. दुसऱ्या दोन शस्त्रास्त्रांनीं सज्ज अशा जहाजांनीं येऊन हिंदुस्थानच्या दुसऱ्या तटावर यावें. यापैकीं एका जहाजानें १९१५ च्या डिसेंबरच्या शेवटीं शांघायहून वळसा घालून हातिया येथें यावें; व दुसऱ्या जहाजानें बालासोर येथें शस्त्रास्त्रसंपत्ति पोहोंचवावी. एका चिनी गृहस्थाच्या हातीं ६६ हजार गिल्डर्स (हॉलंडचें चांदीचें नाणें) देऊन पाठविण्यांत आले होते. या चिनी गृहस्थाला वाटेंत सिंगापूरला अटक झाली. त्याची झडती घेतल्यानंतर त्याच्याजवळ रुपयांव्यतिरिक्त पिनांग येथील एका महत्त्वाच्या बंगाली क्रांतिकारकाचा पत्ता व कलकत्ता येथील क्रांतिकारक संस्थांच्या शाखांचे दोन पत्तेही मिळाले. या वेळीं हिंदुस्थानांत मार्टिन् या नांवानें, त्या वेळचे नरेंद्रनाथ भट्टाचार्य व आजचे सुविख्यात मानवेंद्रनाथ रॉय, हे काम करीत असून बाहेरून रासबिहारी त्यांना मदत करीत होते. नरेंद्रनाथ भट्टाचार्य अथवा मार्टिन् यांचे दोन वंगप्रांतीय दूत हतियाच्या रोखानें येत असलेल्या जर्मन रणतरीला कांहीं विशिष्ट संदेश देण्यासाठीं म्हणून शांघाय येथें पाठविण्यांत आले. पण तेथें त्यांना अटक झाली. महत्वाचीं हीं दोन माणसें इंग्लिशांच्या हातीं पडतांच स्वाभाविकपणेंच हतियाच्या रोखानें शांघायहून निघ-

णाऱ्या रणतरीला जबरदस्त धोका उत्पन्न झाला व महत्वाच्या शस्त्रास्त्रसंपत्तीचा अकारण नाश होण्यांत अर्थ नव्हता म्हणून जर्मन कौन्सल जनरलनें रासबिहारींच्या अनुमतीनें ही रणतरी पाठविण्याची योजना रद्द केली. १९१५ च्या ऑक्टोबरमध्यें शांघाय येथील म्युनिसिपल पोलिसांनीं संशयावरून दोन चिनी इसमांना अटक केली. त्यांच्या झडतींत १२९ ऑटोमॅटिक पिस्तुलें, २०८३० काडतुसें सांपडलीं. रासबिहारींच्या प्रेरणेवरून हें सारें सामान हिंदुस्थानांत येत होतें. त्यांचा पोलिसांनीं बराच छळ केल्यानंतर असें कळलें कीं, त्यांना निएलसेन् नांवाच्या जर्मन गृहस्थानें हें सारें सामान दिलेलें होतें, व तें त्यांना गुप्तपणें कलकत्ता येथील मजूर वस्तीच्या विभागांत राहणाऱ्या अमरेन्द्र चॅटर्जी या नांवाच्या गृहस्थाच्या स्वाधीन करण्याविषयीं आज्ञा सुटली होती. लगेच अमरेन्द्रांच्या नांवानें वॉरंट सुटून त्यांना अटक करण्यासाठीं पोलिसांची धांवपळ सुरू झाली. पण अमरेन्द्र केव्हांच त्यांच्या हातावर तुरी देऊन चंद्रनगरच्या रोखानें फरारी झाला होता. याच सुमारास अवनी मुकर्जी या नांवाचा एक बंगाली क्रांतिकारक जपानहून हिंदुस्थानांत येत असतां त्याला सिंगापूर येथें पकडण्यांत आलें. झडतींत सांपडलेल्या त्याच्या डायरीमध्यें उपर्युक्त जर्मन सद्गृहस्थ **निएलसेन** ( Nielsen ) यांचा पत्ता मिळाला. अधिक बारकाईनें शोध केल्यानंतर असें आढळून आलें कीं, या निएलसेनच्या घरींच रासबिहारी बसू आपल्या अविनाश रॉय नांवाच्या एका सहकाऱ्यासह राहात आहेत. अवनी मुकर्जींच्या दैनंदिनींत शांघाय येथील दोन चिनी सद्गृहस्थांचे पत्ते, चंद्रनगर येथील मतिलाल रॉय यांचा पत्ता, कलकत्ता, डाका व कुमिल्ला येथील कांहीं क्रांति-

कारकांचे व क्रांतिकारक समित्यांचे पत्ते व सयाम येथील एक शीख इंजीनिअर सरदार अमरसिंह यांचा पत्ता इतक्या महत्वाच्या गोष्टी सांपडल्या. लगेच सर्वत्र व विशेषत: शांघायमध्यें झडत्यांचें सत्र सुरू झालें. ज्या दोन चिनी गृहस्थांचे पत्ते अवनी मुकर्जींच्या दैनंदिनींत सांपडले होते त्यांच्या घराच्या झडतींत शेकडों रिव्हाल्व्हर्स व कित्येक हजार काडतुसें पोलिसांच्या हातीं लागलीं. योजना अशी होती कीं, हेनरी एस्. नांवाचें शस्त्रास्त्रांनीं लदबदलेलें जहाज सयाम येथें यावें; त्या जहाजावरील साग शस्त्रास्त्रसंग्रह सरदार अमरसिंह यांच्या स्वाधीन करण्यांत यावा व त्यांनीं तो हिंदुस्थानांतील क्रांतिकारक समित्यांच्या केंद्र शाखांच्याकडे पोहोंचता करावा; पण एकाएकीं अमरसिंहांनाच अटक झाल्यामुळें हाहि व्यूह ढासळला. पुढें अमरसिंहाच्यावर खटला चालून गुलाम राष्ट्रांच्या जीवनांत भयानक अपराध ठरलेल्या, मातृभूमीला दास्यमुक्त करण्याच्या प्रयत्नांत सामील असल्याच्या अपराधावरून त्यांना प्राणदंडाची शिक्षा सुनावण्यांत आली. या शिक्षेवर अपील केल्यानंतर जन्मठेप काळे पाण्यांत तिचें रूपांतर झालें. जीं दोन जहाजें अंदमान द्वीपकल्पावर हल्ला करून तेथील राजबंद्यांना सोडविणार होतीं व नंतर ब्रह्मदेशावर हल्ला करणार होतीं, त्यापैकीं एकाला डच सरकारनें आंतरराष्ट्रीय युद्धनियमांच्या अनुसार पकडलें; व दुसरें अंदमानच्या आसपास येऊन पोहोचलें न पोहोचलें तोंच इंग्रजांचें जंगी लढाऊ जहाज जें एच्. एम्. एस्. कार्नवाल ( H. M. S. Cornwall ) त्यानें समुद्राचा तळ दाखविला. याप्रमाणें मातेच्या दास्यमोचनाचा रासबिहारींनीं उभारलेला तिसरा प्रयत्नही व्यर्थ गेला.

## २०. विगत महायुद्धानंतर

याप्रमाणें महायुद्धासारख्या गुलाम राष्ट्रांच्या सद्भाग्यानें शत-कानुशतकांत क्वचितच प्राप्त होणाऱ्या संधींत रासबिहारींनीं उभारलेलें सारें विप्लवाचें मेरूमांदार दैवाच्या वज्राघातानें ठिकऱ्या ठिकऱ्या उडून पार धुळीस मिळालें. तरीही त्यांचें धैर्य भंग पावलें नाहीं; तरीही त्यांच्या वज्रहृदयाचें पाणी झालें नाहीं. अपयशानें खचून गेलेल्या अन् पुढें एक तर अजीबात राजकारण सोडून देऊन तत्वाचिंतनांत अगर इतर व्यवसायांत निमग्न झालेल्या क्रांति-कारकांचीं अनेक नांवें आपणास माहीतच आहेत; अन् जे कांहीं त्यानंतर राजकारणांत पडलेच तेही कोलांटउडी घेऊन पराभूत मनो-वृत्तींत अहिंसेच्या अथवा सनदशीर व माघारघेऊ मवाळांच्याच होय. या तत्वभ्रष्टतेलाच तत्वनिष्ठतेचा रंग ते फासत असले तरी इति-हाससिद्ध मार्गावरून त्यांची झालेली घसरगुंडी कांहीं लपूं शकत नाहीं. मी त्यांना दोष देत नाहीं. कारण त्यांनीं आपल्या पूर्वायु-ष्यांत जें केलें त्याबद्दल ते वंदनीयच आहेत. त्याविषयीं राष्ट्रानें त्यांचें ऋणीच राहिलें पाहिजे. पण रासबिहारी हे अशा सर्व-मान्य व्यक्तींपैकीं नव्हते. भीमसेनाचें असें सांगतात कीं, त्याची पाठ जमिनीला लागली कीं, त्याचें बळ वाढून तो दसपट अधिक आवेशानें शत्रूवर तुटून पडे. महापुरुषांचेंही असेंच असतें. अपय-शानें त्यांचा धीर खचत तर कधीं नाहींच;पण उलट अंगीकृत कार्या-बद्दलचें त्यांचें अवसान दुप्पट वेगानें उफाळून वर उसळत असतें. असो. महायुद्धानंतर झालेल्या व्हर्सायलच्या तहाच्या भानगडींत जपानचे आणि इंग्लंडचे संबंध कडवटपणानें दुरावले. कारण जपान जरी मित्रराष्ट्राच्या वतीनें युद्धांत सामील झालें होतें व जयाचा वाटा इतराइतकाच जपानच्या साहाय्यानेंही जरी

मित्रराष्ट्रांच्या पदरांत पडला होता तरी व्हर्सायिलच्या तहामध्यें त्याच्या वाट्याला कांहींच आलें नाहीं. त्यांतच We must save the world या वाक्यांत व्यक्त होणारी जगत्‌जेतृत्वाची भावना जपानच्या अंतःकरणांत स्फुरण पावत होती. आशिया खंडांत राहाणाऱ्या सर्व लोकांचा एक आशियावासी संघ स्थापन करून त्या द्वारें ती आकांक्षा पूर्ण करून घेण्याचें जपाननें ठरविलें होतें. ईस्ट इंडीज बेटांच्या प्रश्नावरून अमेरिकेशीं जपानचा संघर्ष सुरू झालाच होता. या घटनांचा अर्थ इतकाच होता कीं, भावी काळांत अँग्लो अमेरिकनांशीं जपानचें युद्ध जुंपणें शक्य कोटींत आलें होतें. रासबिहारींनीं या वातावरणाचा लाभ घेण्याचें ठरवून आपल्या जपानी मित्रांच्या व तेथील भारतीय सहकाऱ्यांच्या साहाय्यानें 'भारतीय स्वातंत्र्य संघ' या नांवाची एक संस्था तेथें स्थापन केली. ते स्वतःच या संस्थेचे अध्यक्ष होते. नुसतें भारताचेंच नव्हे, तर जगांतील साऱ्याच दलितांचें दास्यमोचन हें या स्वातंत्र्यसंघाचें ध्येय होतें. या संस्थेच्या द्वारें त्यांनीं आपल्या कार्याला पुनश्च जोमानें प्रारंभ केला. हिंदुस्थानांतील क्रांतिकारक संस्थांच्या कार्यावर त्यांची दृष्टी होतीच अन् वेळोवेळीं तेथील कार्याचीं प्रतिवृत्तें त्यांच्याकडे जातच असत. कधीं कधीं हीं प्रतिवृत्तें सरकारच्या हातींहि लागत. इ. स. १९२५ सालीं शचींद्रनाथ सन्यालांनीं रासबिहारींना पाठविलेलें असें प्रतिवृत्त सरकारच्या हातीं लागून शचींद्रांना त्याबद्दल दोन वर्षें सश्रम कारावासाची शिक्षाहि झाली होती. स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर हे बॅरिस्टर जमनादास मेहता यांच्या प्रयत्नांनीं रत्नागिरीच्या स्थानबद्धतेंतून सुटल्यावर त्यांचा आणि रासबिहारींचा पत्रव्यवहार सुरू झाला. सावरकरांनीं हिंदुमहासभेचें नेतृत्व

स्वीकारून हिंदुराष्ट्रवादाच्या गर्जनेनें राष्ट्रीयत्वाच्या तत्वज्ञानांत शास्त्रशुद्ध प्रगतीचें नवें पाऊल टाकल्यानंतर रासबिहारींनीं त्या वादाचा पुरस्कार केला. जपानमध्येंही त्यांनीं हिंदुमहासभेची स्थापना केली. १९४० सालीं नागपूर येथें भरलेल्या हिंदुमहासभेच्या सुभव्य अधिवेशनाला आपला आशीर्वाद पाठविला होता.

जपानमध्यें रासबिहारींच्या जीवनाला थोडीशी सुस्थिरता उत्पन्न झाल्यानंतर हिंदुस्थानांत परत येणें कार्याच्या व जीवित-संरक्षणाच्या दृष्टीनें केवळ अशक्य आहे असें पाहून त्यांनीं तो विचारच आपल्या मनांतून काढून टाकला. ते एका सुस्वरूप व सुसंस्कृत जपानी महिलेशीं विवाहबद्ध झाले. तिच्यापासून त्यांना झालेल्या संततीचीं नांवें त्यांनीं भारतीयच ठेवलीं. जे जे भारतीय विद्यार्थी व सद्गृहस्थ जपानमध्यें जात, त्यांचा रासबिहारी अगत्यानें व प्रेमळपणानें परामर्श घेत. एकदां कांहीं भारतीय विद्यार्थी जपानमध्यें गेले असतां तेथील भारतीयांनीं त्यांना अल्पोपहार दिला. या विद्यार्थ्यांमध्यें माझे एक विद्वान मित्र होते. त्यांनीं मला असा अनुभव सांगितला कीं, ज्या ज्या हिंदी लोकांनीं आमच्या स्वागतपर अथवा आम्हांला उपदेशपर भाषणें केलीं त्या सर्वांनीं तीं भपकेदार इंग्रजींतूनच केलीं. पण रासबिहारींनीं मात्र निव्वळ भारतीय समारंभांत इंग्रजींतून भाषण करणें हा दास्याच्या मनोवृत्तीच्या आचरटपणाचाच एक प्रकार आहे असें सांगून स्वतःचें भाषण शुद्धया हिंदींतून केलें. त्यांचा पोषाखहि शुद्ध भारतीयच होता. मीं स्वतः कांहीं रासबिहारींना पाहिलेलें नाहीं. पण माझ्या या मित्रानें त्यांना नुसतें पाहिलेलेंच नसून त्यांच्याशीं त्यांच्या निवासस्थानीं जाऊन संवादही केलेला आहे. त्यानें मला असें सांगितलें कीं, रासबिहारींच्या नेत्रांत अपूर्व आकर्षण असून

त्यांच्या सहवासांत येतांच आपण एका महानुभावाच्या सान्नि-ध्यांत आल्याचा अंतःकरणाला साक्षात्कार होई व मस्तक त्यांच्या-समोर आपोआप विनम्र होत असे. जपानमध्यें असतांना चंद्रनगरच्या 'प्रवर्तक' नांवाच्या मासिकांत स्वतःच्या अद्भुत व रहस्यमय जीवनाच्या कांहीं दालनावर प्रकाश टाकणारे लेख त्यांनीं मध्यं-तरीं लिहिले होते. एकदां त्यांनीं जपानमधील भूकंपाचें आपल्या लेखांतून केलेलें वर्णन कलकत्त्याच्या 'स्टेट्‌समन' या सुविख्यात अँग्लो-इंडियन पत्रानें पुनर्मुद्रित केलें होतें. त्यांचें इंग्रजी लेखन अतिशय प्रभावी असे. एकदां त्यांनीं जपानमधील भूकंपाचें आपल्या लेखांमधून केलेलें वर्णन कलकत्त्याच्या स्टेट्‌समन या सुविख्यात अँग्लो-इंडियन पत्रानें पुनर्मुद्रित केलें होतें.

इतर अनेक प्रकारचे उद्योग करीत असतां ज्यासाठीं आपल्या मातृभूमीचा त्यांनीं परित्याग केला होता, तिचा त्यांना कधींहि विसर पडला नाहीं. त्यांनीं आपल्या क्रांतिकार्याचें सूत्र भारतीय स्वातंत्र्य समिति Indian Independence League या नांवाची संस्था स्थापन करून कार्यान्वित केलें. इतक्यांत त्यांना इ.स. १९४१ चे सुमारास अपेक्षित सुवर्णसंधीचीं पूर्वचिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. जर्मनींत हिटलरचा उदय झाला. सोशल डेमोक्रॅट्‌स् व कम्युनिस्ट या दोघांचाही पाडाव करून हिटलरनें जर्मन राष्ट्राचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं घेतलीं व स्वतःचें बृहत जर्मनीचें स्वप्न प्रत्यक्षांत आणण्या-साठीं तो एकामागून एक देश पादाक्रान्त करूं लागला. जर्मनीच्या पोलंडवरील स्वारीनंतर इंग्लंडनें त्याच्याविरुद्ध शस्त्र उपसलें व युरोपखंडांत भीषण महायुद्ध सुरू झालें. पहिल्या महायुद्धांत जपान दोस्तराष्ट्रांच्या बाजूनें असल्यामुळें भारतीय क्रांतिकारकांचे सारे प्रयत्न विफल झाले होते. पण व्हर्सायलच्या तहानंतर अमेरिका व

जपान यांचे संबंध बिघडले. त्यानंतर द्वितीय महायुद्धाच्या क्षणा-पर्यंत इंग्लंडनें अमेरिकेला आंतून साह्य करून जपानची फसवणूक केल्यामुळें या महायुद्धांत जपान अक्षराष्ट्रांना मिळून इंग्लंडच्या हितशत्रूच्या पाठीशीं उभें राहील, ही गोष्ट रासबिहारींना स्पष्ट दिसूं लागली. त्यांच्या अपेक्षेप्रमाणें जपाननें अक्षराष्ट्रांच्या वतीनेंच महायुद्धांत झप घेतली. रासबिहारींच्या दृष्टीनें ही आतिशयच महत्त्वाची घटना होती. इ. स. १९४२ च्या जून महिन्यांत त्यांनीं ठिकठिकाणच्या भारतीय क्रांतिकारकांना एकत्र करून त्यांची एक मोठी परिषद बँकॉक येथें बोलाविली. या परिषदेला जपानचे युद्धबंदी बनलेले अनेक भारतीय सेनाधिकारी उपस्थित होते. स्वतः रासबिहारी हेच या परिषदेचे अध्यक्ष होते.

## २१. बँकॉक परिषद

या परिषदेंत अशी योजना ठरविण्यांत आली कीं, जपानचे युद्धबंदी बनलेल्या भारतीय सैनिकांनीं आपले प्राण हिंदुस्थानला गुलाम करणाऱ्या व तसेंच चिरकाल ठेऊं इच्छिणाऱ्या ब्रिटिश साम्राज्यसत्तेसाठीं वेचण्याचें पाप करण्याऐवजीं ब्रिटनशीं लढून स्वतःच्या मातृभूमीला स्वतंत्र करण्याच्या पवित्र कार्यांतच ते खर्ची घालावे. तदनुसार एक मोठें सैन्य उभारण्यांत येऊन त्याचें नांव Indian National Army असें ठेवण्यांत आलें. सुप्रसिद्ध 'आझाद हिंद सैन्य' तें हेंच होय. आझाद हिंद सैन्याचा इतिहास सर्वांनाच माहीत असून त्यावर निरनिराळीं मोठीं व अधिकृत पुस्त-केंच तयार होत असल्यामुळें त्यासंबंधानें येथें वर्णन करण्याचें कारण नाहीं. फक्त रासबिहारींचेंच काय तें वृत्त येथें द्यावयाचें आहे. असो. रासबिहारी बसू हेच आझाद हिंद सैन्याचें व पुढें सुभाषचंद्रांचें महान नेतृत्व लाभलेल्या दुसऱ्या भारतीय स्वातंत्र्य-

युद्धाचे खरे जनक होत हें यावरून ध्यानांत येईल. याप्रमाणें Indian National Army अथवा सुप्रसिद्ध आय्. एन्. ए. ची स्थापना झाल्यानंतर Indian Independence League नें सैन्यभरती, पैसे, धान्य, कपडे इत्यादिकांची सोय करण्याचें काम अंगावर घेऊन जपानच्या सरकारकडून शस्त्रास्त्रें व युद्धसामुग्री यांचा पुरवठा करून देण्याचा पतकर घेतला. आय्. एन्. ए. हें इंडियन इंडिपेंडन्स लीगचें सैन्य व रासबिहारी त्याचे सुप्रीम कमांडर अथवा नेते होते Indian National Armyच्या प्रतिष्ठापनेनंतर जपानांकित प्रदेशांतून व जपानचे युद्धबंदी बनलेल्या भारतीय सैनिकांतून हजारों लोक या सैन्यांत भरती होऊं लागले. जे लोक या सैन्यांत भरती होत नसत त्यांचा युद्धबंदी या नात्यानें जपान सरकार छळ करीत असे व त्यांतून रासबिहारींनीं त्यांना वांचाविलें नाहीं असा त्यांच्यावर एक आरोप आहे. पण एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, रासबिहारी कांहीं एखादा रिलीफ कमिटीचा उद्योग करावयास जपानमध्यें स्थायिक झालेले नव्हते. भारतीय स्वातंत्र्यसेनेंत समाविष्ट न होतां ब्रिटिश साम्राज्यशाहीचे हस्तक बनून स्वतःच्या मातृभूमीला दास्याच्या पंकांत राहूं देण्यांत ज्यांना खंत वाटत नव्हती, त्यांच्या शरीरसुखाची काळजी वहात बसण्याचें रासबिहारींना काय कारण ?

## २२. सुभाष व रासबिहारी

द्वितीय महायुध्द सुरू झाल्यानंतर नेहमींच्या राजकारणाऐवजीं निर्णायक सशस्त्र लढा देण्याची हीच खरी वेळ आहे, असें ज्या भारतांत राहणाऱ्या भारत राष्ट्राच्या नेत्यांना समजलें होतें, त्यांत स्वातंत्र्यवीर सावरकर व देशगौरव सुभाषचंद्र बोस हे अग्रगण्य होत. सुभाषचंद्र बोस यांनीं देशाचीं सूत्रें ज्यांच्या

हातांत होतीं, त्यांच्याशीं दोन वेळां टक्कर देऊन आपला बाणेदार-पणा दाखविला. पण हिंदुस्थानांतील जनता जशी त्यांच्या पाठीशीं हवी होती, तशी ती नसल्याचें त्यांच्या प्रत्ययास आलें. महा-युध्दाचें टिपरू डंक्यावर पडतांच त्यांचें आतंकवादी मन त्यांना स्वस्थ बसूं देईना. भारताच्या स्वातंत्र्याचा निर्णायक लढा देण्याची हीच वेळ आहे हें त्यांनीं ओळखलें व स्वातंत्र्याचा शिरपेंच त्यांच्या हातूनच आपल्या मस्तकीं धारण करण्याची देवी भारतीचीहि इच्छा असल्यामुळें त्याना तशीच प्रेरणा झाली. पुरोगामी पक्षाचे अध्वर्यु म्हणून या सुमारास त्यांनीं एक अत्यंत सूचक भाषण केलें होतें. देशभर दौरा करून त्यांनीं भारतांतील सर्व नेत्यांच्या भेटी घेतल्या. वीर सावरकरांची व त्यांची दोन दिवस अत्यंत महत्वाची बैठक झाली. त्या बैठकींत हिंदुस्थानांत राहून सावरकरांनीं सैन्यभरतीच्या कार्यक्रमाच्या द्वारें हिंदुस्थाना-बाहेर भारतीय सैनिक पाठवावे व देशगौरव सुभाषांनीं या सैनिकां-तून विशाल संघटण निर्माण करून अक्षराष्ट्रांच्या विशेषतः जपानच्या साहाय्यानें ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं युध्द करावें असें ठरलें. हिंदुस्थानाबाहेर सुभाषांनीं जावयाचें तें कसें ? डोळ्यांत तेल घालून ब्रिटिश सरकार प्रत्येक पुढाऱ्यांच्या हालचालीकडे लक्ष लावून बसलें होतें. सुभाष हे अशा थोर नेत्यां-पैकीं होते कीं, ज्यांच्या साध्या शिंकेचासुध्दां भारताच्या काना-कोपऱ्यांतूनसुध्दां बभ्रा व्हावयाचा. पण त्यांनीं एकाएकीं आध्या-त्मिक उपासनेचा त्यांना झटका आल्याचें दाखविलें. एकांतांत एका खोलींत त्यांनीं स्वतःला कोंडून घेतलें. अखंड जपजाप्य करीत ते त्या खोलींत राहत. कोणाचीही ते त्या दिवसांत भेट घेत नसत. त्यांची दाढी वाढलेली होती. केवळ त्यांच्या पुतण्याशिवाय दुसऱ्या

कोणालाहि त्यांचें दर्शन होणें बंद झालें. एकदां लहानपणीं असेंच ते तपश्चर्येप्रीत्यर्थ हिमाचलांत निघून गेल्याचा इतिहास त्यांच्या पाठीशीं असल्यामुळें त्यांच्या या गूढ वर्तणुकीविषयीं कोणालाही संशय येऊं शकला नाहीं. त्यांच्या शत्रूंना व मित्रांनाहि वाटलें कीं, भौतिक परिस्थितींत वारंवार येणाऱ्या अपयशामुळें खचून जाऊन सुभाष पुन्हा अध्यात्मिक मार्गाकडे वळले असावे. कांहीं दिवसांनीं हा प्रकार संपेल व ते पुन्हा व्यवहारांत येतील. अशा भोंवतीच्या निगूढ वातावरणांतूनच एक दिवस ते गुप्त झाले. ' चले जाव ' ची घोषणा, कागदी ठराव व टाळ्यांचा गजर यापेक्षांही तोफांच्या धडधडाटांतून करण्याचा त्यांचा कृतनिश्चय होता. बंगालमधून गुप्तपणें सुभाष अफगाणिस्थानांत आले व अनक प्रकारच्या हालअपेष्टा सोशीत ते अक्ष राष्ट्राच्या सूत्रधारांना भेटले. वंगकेसरी सुभाषांना पाहतांच रासबिहारींचें अंतःकरण उचंबळून आलें. या विशिष्ट क्षणीं जें करावयास हवें तें करावयास हा एकटाच महापुरुष समोर आला म्हणून त्यांना कृतकृत्यता वाटली. स्वार्थ असा त्यांना कांहीं उरलाच नव्हता. सुभाषांचें व्यक्तिमत्व, त्यांची लोकप्रियता व त्यांचें सामाजिक अधिष्ठान आपल्यापेक्षां अधिक दैदीप्यमान आहे असें पाहून जगाच्याच काय, पण अलीकडच्या हिंदी नेत्यांच्याहि जविनांत सर्वस्वीं अशक्य असलेली एक अपूर्व गोष्ट रासबिहारींनीं करून दाखविली. त्यांच्या थोर व्यक्तिमत्वाचा तिच्यांतून अधिकच दैदीप्यमान प्रत्यय येतो. वस्तुतः आझाद हिंद सैन्य रासबिहारींनीं स्थापन केलें होतें. त्या सैन्याच्या सुप्रीम कमांडरचें सर्व-श्रेष्ठ स्थान त्यांचें होय. पण सुभषांना पाहतांच या थोर पुरुषानें स्वतःचें सिंहासन मोकळें करून सुभाषांना आझाद हिंद सैन्याचे सुप्रीम कमांडर व स्वतंत्र भारत सरकारचे अध्यक्ष

होण्याची विनंति केली व आपण स्वतः सुभाषांच्या सल्लागार मंडळांत एक प्रमुख सल्लागार म्हणून ते राहिले. रासबिहारींनीं आजवर केलेल्या सर्व प्रकारच्या त्यागांत हा त्याग सर्वश्रेष्ठ होय. नेतृपदाच्या रक्ताला जळवाप्रमाणें चिकटून राहण्याच्या आजच्या वातावरणांत रासबिहारींचा हा महनीय त्याग विशुद्ध राष्ट्रभक्तीचें ज्वलन्त उदाहरणच होय. सुभाषांनीं केलेली स्वतंत्र भारत सरकारची प्रतिष्ठापना व त्याला मिळालेली अकरा स्वतंत्र राष्ट्रांची मान्यता त्यांनीं पाहिली. युद्ध जोरांत सुरू होतें. अशा स्थितींत सिंगापुराहून युद्ध समितीची एक महत्वाची बैठक आटोपून येत असतां वाटेंत विमानाला अपघात होऊन त्यांत रासबिहारींची झुंजार जीवनकथा संपली. कोणाला तें पुष्कळ दिवस खरेंच वाटेना. क्रांतिकारक जीवनांत ते इतकेदां मरून पुन्हा जिवंत झाले आहेत कीं वेड्या आशेला तसेंच पुन्हा घडेल असें वाटलें. इतका व्यक्तित्व राष्ट्राच्या सामुदायिक जीवनांत विलीन करून टाकलेल्या इतका यशापयशाच्या व सुखदुःखाच्या द्वंद्वाच्या अतीत असलेला, इतका जीवनाच्या अंतिम विरामचिन्हापर्यंतचा प्रत्येक क्षण केवळ रणांत घालविलेला व इतका व्यवसायात्मिक बुद्धीचा पुरुष भारतीय क्रांतिकारकांच्या इतिहासांतहि दुसरा नाहीं. ज्यांच्याविषयीं यथार्थतेनें

*व्यतिकरितदिगंताः श्वेतमानैर्यशोभिः*
*सुकृतविलसितानां स्थानमूर्जस्वलानाम् ।*
*अगणितमहिमानः चेतनं मंगलानाम्*
*कथमिव भुवनेऽस्मिन् तादृशाः संभवान्ति ॥*

असें म्हणतां येईल. अशा योग्यतेचे रासबिहारी हे पुरुष होऊन गेले यांत शंका नाहीं.

—: समाप्त :—

# सुरसग्रंथमाला ( पंढरपूर )

## जुनीं प्रकाशनें

| अ.नं. | नांव | रु. आ. पै. |
|---|---|---|
| ९ | जर्मन मोहीम, गहनगूढ, प्रेमपरीक्षण ... ... | २-१०—० |
| १० | सत्यमेव जयते व शैशव सहचरी ... ... | २—०—० |
| १९ | पितृप्रेम ( नाटक )—परांजपे ... ... | ०—१०-० |
| ४१ | दैवदुर्विपाक व भयंकर भूल—सव्यसाची ... | ३—४—० |
| ४४ | मृगेंद्रलीला-प्रभंजन ... ... ... | ३-१२—० |
| ४५ | ईश्वरी लीला व आशानिराशा—नरवणे ... | ३-१२—० |
| ४६।४७ | प्रेमाश्रम, भाग १।२—प्रभाकर... ... | ७—०—० |
| ४८।४९ | वीरात्मा, भाग १।२-गणेशशास्त्री फाटक ... | ७—०—० |
| ५२ | विजयनगरची साम्राज्यस्थापना—दातार ... | ३—८—० |
| ५३ | कुमार अशोक—लिमये ... ... ... | ३—४—० |
| ५४।५५।५६ | जगाचा बाजार, भाग १।२।३ एकत्र... | ९—८—० |
| ५७ | ढोंगी गुरूच्या सैतानी लीला-गणेशशास्त्री फाटक... | ३—८—० |
| ५८ | हा संशयाचा प्रताप—ग. वि. कुलकर्णी... ... | ३—८—० |
| ६० | भाईबंद व नराचा नारायण—दातार ... ... | ३—४—० |
| ६२ | प्रेमबंधन—दातार ... ... ... | ३—८—० |
| ६३ | प्रतापादित्य—वा. शि. हडकर ... ... | ३—८—० |
| ६४ | देवी कल्याणी—अज्ञात ... ... ... | ३—८—० |
| ६५ | भीषण सूड—अज्ञात ... ... ... | ३—४—० |
| ६६ | अमृत कीं विष—हडकर ... ... ... | ३—४—० |
| ६७ | रत्नगडची रंभा—सहृदय ... ... ... | ३—४—० |
| ६९ | रक्ताचें गालबोट—परांजपे ... ... ... | ३—४--० |
| ७१ | देशभक्त—अनंतवार ... ... ... | १—०—० |
| ७२ | गृहदेवी--प. स. देसाई ... ... ... | २--०--० |
| ७३ | भावकला—ल. रा. पटवर्धन ... ... ... | २—०—० |
| ७४ | धरणीकंप—वि. वा. हडप ... ... ... | २—०—० |
| ७५ | कॉटनफिगर—अनंतवार ... ... ... | ०-१२—० |
| ७७ | उमाडलेल्या भावना—कवठेकर ... ... | २—०—० |

# नवीं प्रकाशनें

| अ. नं. | नांव | रु. आ. पै |
|---|---|---|
| ८५ | ओझरती नजर—के. मा. नाईक ... ... | ४—०—० |
| ८७ | छत्रसाल (संक्षिप्त)—वालचंद शहा, २ री आवृत्ति | ४—०—० |
| ८८ | भिरभिरें—गंगाधर गाडगीळ ... ... | ३—०—० |
| ८९ | तूं भेटायला नको होतास—सरोजिनी बाबर ... | ३—०—० |
| ९० | मायेचा पाझर—शांता शेळके ... ... | ३—०—० |
| ९१ | मीलन-अरविंद गोखले .... ... ... | ३—०—० |
| ९२ | सम्राट् अशोक—वालचंद शहा, ३ री आवृत्ति... | ६—०—० |
| ९३ | सर्व हक्क स्वाधीन —बोकील .... ... ... | ४—०—० |
| ९४ | भूकवळी—सुरेश शर्मा ... ... | २—०—० |
| ९६ | पाटणची प्रभात-कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६—०—० |
| ९७ | पूर्व आणि पश्चिम--शांतिलाल भंडारी ... ... | ४—८—० |
| ९८ | वैरपूर्ती-कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति ... | ८—०—० |
| ९९ | अल्मिनार-पद्माकर डावरे ... ... | ३—०—० |
| १०० | जीवननृत्य—मीनाक्षी साने ... ... | ३—८—० |
| १०१ | गुजराथचा नाथ-कन्हैयालाल मुनशी, २ री आवृत्ति | ६—०—० |
| १०२ | बजाजी निंबाळकर-वालचंद शहा ... ... | ४—०—० |
| १०३ | नौका-डुबी-टागोर, २ री आवृत्ति .... ... | ५—०—० |
| १०४ | गोष्टांतील सुंदर स्त्रिया-कोठारी, ३ री आवृत्ति... | ५—०—० |
| १०५ | गृहिणी (टॉलस्टॉय)-निरंतर, २ री आवृत्ति .... | ३—०—० |
| १०६ | जागरण-अरविंद गोखले ... ... | ३—०—० |
| १०७ | पाटलाची लेक-चौगुले ... ... | ३—०—० |
| १०८ | ओझरती नजर, २ री आवृत्ति ... ... | |
| १०९ | छत्रसाल-वालचंद शहा ३ री आवृत्ति... ... | ३—०—० |
| ११० | मदिरा-मस्तानी-भांगरे ... ... | २—०—० |
| १११ | लंडन येथील बडया लोकांचीं गुप्त कृत्यें भाग १ ला | १—८—० |
| ११२ | ,, २ रा | ,, |
| ११३ | ,, ३ रा | ,, |
| ११४ | ,, ४ था | ,, |
| ११५ | ,, ५ वा | ,, |
| ११६ | सैन्य चाललें पुढें-बोकील ... ... ... | ३—०—० |
| ११७ | कावळा व ढापी-न. चिं. केळकर ... ... | ४—०—० |

ण्याची कामगिरी पत्करली. ते हें निश्चित ओळखून होते कीं, भाईजी जसे या प्रकाराला उघड उघड संमति देणार नाहींत, त्याचप्रमाणें दुसरें कांहीं सुचवूंहि शकणार नाहींत. अशा स्थितींत त्यांना विचारून अकारण अपशकुन करून घेण्यापेक्षां कांहीं न विचारणें काय वाईट? भाईजींना कांहींच न विचारतां दुसऱ्या दिवशीं कर्तारसिंहानीं आपल्या त्या विचारमग्न सहकाऱ्यांना स्वच्छ असें सांगितलें कीं, " मी भाई परमानंदांना काय विचारावयाचें तें विचारून आलेलों आहें. त्यांची या गोष्टीला पूर्ण संमति असून त्यांचेंहि मत माझ्याचसारखें आहे. मात्र पन्नास लोक एकच गोष्ट विचारावयास गेले तर भाईजींना असें वाटेल कीं, या लोकांना प्रत्यक्ष कांहींच करावयाचें नसून नुसती बडबड मात्र करावयाची आहे. या बडबडीनें व्यर्थ कार्यनाश होईल; म्हणून भाईजी स्वच्छ नकार देतील." भाईजींचें हें मत व कर्तारांचें त्यावरील भाष्य ऐकतांच सर्वांचींच तोंडें गप्प झालीं.

अंबाला जिल्ह्यांतील लारू गांवचे निवासी व या मंडळींचे एक नेते प्रख्यात **सरदार पृथ्वीसिंह** यांच्यावर या वेळीं वॉरंट निघालें होतें. ८ डिसेंबर १९१४ रोजीं त्यांची रस्त्यांत एका ओळखीच्या पोलिस ऑफिसरशीं गांठ पडली. पण पृथ्वीसिंह, तो जवळ येऊं लागतांच, त्याला एक जोराची गचांडी देऊन पहातां पहातां अदृश्य झाले. असो.

कर्तारसिंहांनीं ठरविलेल्या या बेतानुरूप १७ डिसेंबर रोजीं हिसार जिल्ह्यांतील पिपी या गांवीं एका ब्राह्मण सावकाराच्या घरीं दरवडा घालण्यांत आला. या दरवड्यांत बावीस हजार रुपये एक हातीं रक्कम क्रांतिकारकांच्या हातांत पडली. डिसेंबर महिन्याच्या उत्तरार्धांत पंजाब सरकारनें पंजाबची एकंदर परिस्थिति मध्यवर्ती